






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



६९८३

म.सा.पत्रिका १९८०.८१

अंक २१४ ,२१५, २१६,२१७

जुलै - डिसेंबर १९८० - ग्रामीण साहित्यविशेषांक
म. सा. प.
संपादक – आनंद यादव

अंक २१७ एप्रिल ते जून १९८१
अंक २१४-२१५ जुलै ते डिसें. १९८०
(ग्रामीण साहित्य विशेषांक)

# महाराष्ट्र साहित्य-पत्रिका

संपादक : आनंद यादव



एप्रिल–मे–जून १९८१ • किंमत पाच रुपये

परिषदेच्या अमृतमहोत्सव प्रसंगी प्रकाशित झालेली
मजकूर, मुद्रण आणि सजावट या दृष्टीने आगळी

## सचित्र स्मरणिका

# अमृत-शारदा

संपादक : **ग. वा. बेहेरे**

**अंतरंग : भाग १**

७५ वर्षांची वाटचाल – म. श्री. दीक्षित

**अंतरंग : भाग २** साहित्यिकांची खुमासदार ललित शब्दचित्रे

कुसुमाग्रज–वसंत कानेटकर, पु. ल. देशपांडे–रवींद्र पिंगे, गो. नी. दांडेकर–व. दि. कुलकर्णी, लक्ष्मणशास्त्री–दिनकर साक्रीकर, प्रभाकर पाध्ये–स. शि. भावे, नरहर कुरुंदकर–राम शेवाळकर, महादेवशास्त्री–श्री. ना. पेंडसे, गंगाधर गाडगीळ–बाळ गाडगीळ, अरविंद गोखले–दि. बा. मोकाशी, श्री. ज. जोशी–वि. ग. कानिटकर, दि. बा. मोकाशी–वि. शं. पारगावकर, रणजित देसाई–शिवाजी सावंत, सुरेश भट–मधुकर केचे, शांता शेळके–निर्मला मोने, मनमोहन–न. म. जोशी, धोंडो विठ्ठल–माधव मनोहर, द. मा. मिरासदार–वसंत मिरासदार, बाबूराव ठोकळ–म. श्री. दीक्षित, रमेश मंत्री–माधव कानिटकर, विन्दा करंदीकर–चंद्रकांत बांदिवडेकर, अनिल–अरविंद मंगरूळकर, नानासाहेब गोरे–विद्याधर पुंडलिक (मुलाखत) आणि अशा या संग्राह्य स्मरणिकेचे **मूल्य १० रु. फक्त.** (टपालासह रु. १२-५०)

प्रती मोजक्या ! त्वरा करावी.

# महाराष्ट्र-साहित्य-परिषद, पुणे ३०

## वार्षिक साधारण सभा

**सूचना**

स. न. वि. वि. दि. १० जून १९८१

म. सा. परिषदेची वार्षिक साधारण सभा रविवार दि. २८ जून १९८१ ला सायंकाळी ठीक ५ वाजता पुणे येथे परिषदेच्या ‘पटवर्धन सभागृहा’त भरणार आहे. सभासदांनी या सभेला अवश्य यावे ही विनंती.

**कामे**

१ श्रद्धांजली
२ मागील सभेचा वृत्तान्त वाचून संमत करणे.
३ वार्षिक कार्यवृत्त ( १९८०–८१ ) संमत करणे.
४ वार्षिक हिशेबपत्रके ( उत्पन्न खर्च व ताळेबंद १९८०–८१ ) संमत करणे.
५ अर्थसंकल्प ( १९८१–८२ ) संमत करणे.
६ हिशेबतपासनिसांची नियुक्ती.
७ पत्रव्यवहार.
८ अध्यक्षांच्या संमतीने आयत्या वेळची कामे.

आपले

म. श्री. दीक्षित
न. ग. जोशी
द. ता. भोसले
कार्यवाह

पु. शं. पतके
कोषाध्यक्ष

वसंत कानेटकर
अध्यक्ष
वि. रा. करंदीकर
कार्याध्यक्ष

महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृती-मंडळ पुरस्कृत
महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

संपादक

आनंद यादव

संपादन समिती

व. दि. कुलकर्णी
न. म. जोशी
वसन्त सावन्त

सल्लागार

गो. म. कुलकर्णी
द. ता. भोसले

एप्रिल १९८१
ते
जून १९८१
अंक क्रमांक
२१७

मूल्य पाच रुपये

मुद्रक

चिं. स. लाटकर
कल्पना मुद्रणालय, पुणे ३०

प्रकाशक

न. म. जोशी
कार्यवाह, म. सा. परिषद, पुणे ३०

अनुक्रमणिका

## श्रद्धांजली

गेल्या महिन्या दीड महिन्यात डॉ. के. ना. वाटवे, प्रा. वि. मा. दी. पटवर्धन, श्री. ग. पां. परचुरे अशी ख्यातनाम मंडळी दिवंगत झाली याचे परिषदेला मोठे दुःख होत आहे. 'रसविमर्श'कार नानासाहेब वाटवे यांचा परिषदेशी आणि लेखक या नात्याने पत्रिकेशी अनेक वर्षांचा ऋणानुबंध होता. त्यांचे संस्कृत-मराठीतील पांडित्य आणि रसिकत्व, तसेच अध्यापनकौशल्य वादातीत होते. विमादी आपल्या विविध विनोदी लेखनामुळे असेच लोकप्रिय होते. परचुरेशेठ हे मराठीतील एक श्रेष्ठ प्रकाशक. वीर सावरकर, आचार्य अत्रे यांच्यासारख्यांचे साहित्य सातत्याने प्रकाशित करून त्यांनी मोठी कामगिरी बजावली अखेरच्या दिवसांत पुण्यात त्यांनी अत्र्यांचे स्मारक उभे केले.

या तिघांना आदरपूर्वक श्रद्धांजली.

अनुक्रमणिका

## ऋणनिर्देश

पुण्यातील एक वयोवृद्ध ग्रंथप्रेमी नागरिक श्री. गणेश गोपाळ ठाकूर देसाई यांनी परिषदेला नुकतीच रु. १२०००ची उदार देणगी दिली. ही देणगी मुदत ठेवीत गुंतवली जाईल व तिच्यावरील व्याजातून एका वर्षी पाच व्याख्याने होतील आणि दुसरे वर्षी दोन ललितेतर ग्रंथांना पारितोषिके ('श्री. गणेश-सरस्वती ठाकूर देसाई' स्मृत्यर्थ) दिली जातील. (अधिक तपशील पत्रिकेतून दरवर्षी प्रसिद्ध होईल.) या उदार देणगीबद्दल आणि ती मिळवून दिल्याबद्दल श्री ठाकूरदेसाई आणि परिषदेचे विश्वस्त श्री. वि. त्र्यं. शेटे यांची संस्था ऋणी आहे.

बेळगावचे रसिक उद्योगपती श्री. वा. म. गोगटे परिषदेच्या अमृत-महोत्सवाला आले असता, रु. ५००१ ची रक्कम देऊन ते उपकर्ते (आजीव) सभासद झाले.

कवयित्री श्रीमती पद्‌मा गोळे आणि सकाळ पेपर्स प्रा. लि. यांनी अमृतमहोत्सव प्रसंगी रु. २००० आणि रु. १५०० च्या देणग्या आपणहून दिल्या.

अमृतमहोत्सवानिमित्त सक्रिय साहाय्य करण्यात अनेकांचे सक्रिय सहकार्य लाभले. त्यात महाराष्ट्र शासन, पुणे महानगरपालिका, आकाशवाणी आणि दूरदर्शन, वृत्तपत्रे, डॉ. वसंतराव पटवर्धन, श्री. श्री. ग. मुणगेकर, टिळक स्मारक मंदिर इत्यादींचे विशेष सहकार्य लाभले. या सर्वांचे, इतर देणगीदारांचे, जाहिरातदारांचे व सर्व संबंधितांचे आम्ही ऋणी आहोत.

**कार्यवाह**

अनुक्रमणिका

# अनुक्रमणिका



■

# स्वातंत्र्योत्तर मराठी साहित्यातील चळवळीचे मूलस्रोत

चंद्रकांत बांदिवडेकर

स्वातंत्र्यप्राप्तीचा व साहित्यातील प्रवाहांचा काही संबंध आहे काय हा प्रश्न काहींच्या मनात येत असतो. त्यांचे म्हणणे असे : १९४७ नंतर मराठी साहित्यात मूलभूत परिवर्तन नोंदविणारा साहित्य-प्रवाह निर्माण झाला काय ? नव-साहित्याची प्रेरणा १९४२।४३ ची. तेव्हा स्वातंत्र्योत्तर शब्दाला महत्त्व ते किती द्यायचे ? स्वातंत्र्य-प्राप्तीच्या औपचारिक दिवसाचा व साहित्यिक प्रवाहांचा असा संबंध लावला तर परिस्थिती मोठी कठीण आहे. एका वेगळ्या क्षेत्रातून हा प्रश्न असा केला जातो : स्वातंत्र्याने आम्हास काय दिले ? खरे तर स्वातंत्र्य म्हणजे राजकीय शासनाचे स्थित्यंतर एवढाच संकुचित अर्थ या मंडळींनी घेतलेला दिसतो. खरे तर स्वातंत्र्याचा आशय १९२८-२९ नंतर थोडा थोडा स्पष्ट होऊ लागला होता. समाजवाद, लोकशाही आणि धर्मातीतता या तीन तत्त्वांचा साक्षात्कार भारतीय मनाला एकदम झाला नव्हता. आपल्या काळाशी मान राखणाऱ्या विचारवंतांना स्वातंत्र्याचा आशय या तत्त्वत्रयीच्या रूपाने प्रतीत होत होता. हे मात्र खरे की वैचारिकतेचे वावडे असलेल्या व वैयक्तिक प्रतिभेचे अतिरेकी कोडकौतुक करणाऱ्या आत्ममग्न साहित्यिकांना हे युगभान फारसे नव्हते. दुर्दैवाने अशा साहित्यिकांची संख्या अधिक होती. हे साहित्यिक स्थलकालाच्या व युगीन जिवंत संदर्भांच्या तसेच बदलत्या वास्तवाच्या गतिशील जाणिवांच्या आघातापासून दूर राहून फक्त साहित्यिक परंपरांच्या आवर्तनात साहित्य-लेखन करीत होते. जेव्हा स्वातंत्र्योत्तर साहित्यिक चळवळींच्या मागोव्याचा विचार आपण करतो तेव्हा १९४७ सारखे राजकीय दृष्ट्या औपचारिक महत्त्वाचे वर्ष लक्षात न घेता राजकीय स्वातंत्र्याचा आशय ज्या काळात साहित्यिकांनी मनोमन मुरवून घेतला तो काळ महत्त्वाचा आहे. या दृष्टीने १९४२ चे युवकांचे अयशस्वी आंदोलन १९४७ च्या औपचारिक वर्षापेक्षा महत्त्वाचे ठरावे. कारण युवकमनाला खऱ्याखुऱ्या मुक्ततेचा थरारक अनुभव देणारे असे ते आंदोलन होते. अर्थातच त्याच्या आसपास नव-साहित्यिकांनी नव्या प्रकारच्या साहित्य-लेखनाचा प्रयत्न केलेला जवळ जवळ भारतीय साहित्यात आढळून येतो. या सुमारास साहित्यात उत्पन्न

अनुक्रमणिका






झालेल्या साहित्यिक प्रवाहांचा स्वातंत्र्याच्या चळवळीशी वा राजकीय विचारसरणींशी प्रत्यक्ष संबंध नसला तरी तरुण मनाला आलेली मुक्ततेची उभारी स्वातंत्र्याच्या आशयाशी निश्चितपणे संबद्ध आहे. या मुक्ततेचा एक पैलू साहित्यिक परंपराच्या जाचातून सुटण्याच्या धडपडीत आढळतो. साहित्याच्या वा विचारांच्या बाह्य दडपणापासून स्वतंत्र होऊन स्वतःच्या लेखकीय व्यक्तित्वाशी इमानदार राहण्याचे भान या काळात निर्माण झाले. या काळात मराठी काव्यात व कथेत परिवर्तन झालेले दिसते.

लेखकीय व्यक्तित्वाच्या स्वायत्ततेचे महत्त्व कलावादानेही मानले होते, पण कलावाद शुद्ध स्वरूपात मराठी साहित्यात आलाच नाही. फडक्यांच्या कलावादाचा सुख-वादाशी समझौता झालेला दिसतो. हा सुखवाद एकूण मराठी साहित्यावर प्रभाव टाकणारा एक मूल स्रोत आहे असे म्हटले पाहिजे आणि ज्या मध्यमवर्गीय मानसिक स्थितीत एकूण मराठी साहित्य निर्माण झाले त्याचा सुखवादाशी फारच जवळचा संबंध आहे. कलावंताने आत्माविष्कारासाठी लिहावे आणि आनंद देण्यासाठी लिहावे या दोन भिन्न प्रेरणा आहेत. मराठी कलावादाने रंजनवादाशी सोयरीक केली. युरो-पियन कलावाद ज्या वैज्ञानिक वर्चस्वाला विरोध करण्याच्या भूमिकेतून व स्थूल उपयोगितावादाची प्रतिक्रिया म्हणून आला तसा प्रकार मराठीत झाला नाही मराठीतील कलावादाने सिद्धान्ततः व प्रत्यक्ष साहित्य-निर्मितीतही रंजनवादाशी तडजोड केलेली दिसते. फडक्यांच्या आधी न. चिं. केळकरांनी कलावादासंबंधी काहीशी नकारात्मक भूमिका घेतली होती. कलेच्या पाठी सत्यशोधनाचा व नीतिवादाचा गुप्त पोलिस लावू नये अशी ती भूमिका होती. पत्रकाराने व राजकारणात रुची असलेल्या विचारवंताने साहित्यासंबंधी विभाजित व्यक्तित्वाच्या माणसासारखी भूमिका घ्यावी याचे आश्चर्य वाटण्याचे कारण नाही, कारण एकूण मराठी बुद्धिवादी मनाने राज-कारण, समाजकारण यांचा ललित साहित्याशी साक्षात संबंध ठेवताना काहीसे कच-खाऊ धोरण अंगीकारलेले आहे. तो मराठी बुद्धिजीवी ललित साहित्यिकांचा स्वभाव-धर्म बनलेला आहे. वा. म. जोशी, वि. स. खांडेकर, भा. वि. वरेरकर यांनी जीवनवादी भूमिका घेतली पण प्रत्यक्ष लेखनात कलावादाशी खूपच तडजोड केली. रविकिरण मंडळाची कविता या तडजोडीतूनच लिहिलेली, पण कलावादाकडे झुकलेली अशी आहे. स्वातंत्र्यपूर्वकाळात पु. य. देशपांडे यांची साहित्यविषयक भूमिका व्यक्तिवादाने प्रभावित झालेली होती ( त्यांच्या राजकीय विचारसरणीवर साम्यवादाचा प्रभाव होता ). माडखोलकरांनी ' मुक्तात्मा 'मध्ये दाखवलेली समग्रतेची जाणीव पुढे सुख-वादी प्रभावामुळे क्षीणबल झाली. या सर्वांत आचार्य अत्रे व कुसुमाग्रज यांच्या विचारात व ललित साहित्य निर्मितीत खूप एकवाक्यता होती. मराठी एकूण साहित्यावर सुखवादाच्या पडलेल्या गडद छायेचा एक परिणाम असा दिसतो की, हे साहित्य

वरूहंशी स्त्री-पुरुष प्रेमसंबंधाने संकुचित झालेले आहे. मराठी नागर कथेत स्त्री-पुरुषांच्या प्रणयाव्यतिरिक्त लिहिलेल्या कथा फार कमी आहेत. या संदर्भात य. गो. जोशींचे नाव महत्त्वाचे. त्यांना मध्यमवर्गीय कौटुंबिक कथाकारांची मर्यादा ओलांडता आली नसली तरी मराठी कथेच्या साचेबंद प्रणयप्रसंगातून त्यांनी काही वेगळ्या भावबंधांच्या कथा लिहिल्या.

या स्त्री-पुरुष प्रणयसंबंधाला एक फार मोठी जमेची बाजू आहे. स्त्री पुरुष प्रणय-संबंध अगदी परक्या वातावरणातून आले असे समजण्याचे कारण नाही. संस्कृत वाङ्मय, मराठी वाङ्मयातील शाहिरी वाङ्मय यांतून प्रणयाची परंपरा अगदी स्वदेशी म्हणावी इतकी पुष्ट होती. शिवाय नागर जीवनात सहशिक्षणाच्या वाढीमुळे व कॉलेजे व विद्यापीठांसारख्या संस्थांमुळे प्रणयानुभवाला पुरेशी आधारभूमी निर्माण झाली होती. वर उल्लेखिलेली जमेची बाजू ही : मराठी मध्यमवर्गीय लेखक समानतेच्या व सन्मानाच्या भूमिकेतून स्त्रीवर्गाकडे पाहायला लागला होता. स्त्रीची नवी नवी रूपे ( प्रत्यक्षात असलेली वा कल्पनेने आकांक्षिलेली ) तो पाहू लागला होता. जीवनात एका नव्या सामर्थ्याचा, सुखाचा, सार्थकतेचा शोध घेऊ लागला होता. स्त्री ही भोग्य नाही, ती सहचरी आहे ही समानतेची दृष्टी निश्चितपणे महत्त्वाची होती व जीवनात प्रणय येणे हा एक मोठा मुक्ततेचा अनुभव होता, नवा होता, आधुनिक होता. या प्रणयाला काही मर्यादा होत्या. काही वेळा हा प्रणय जुन्या उत्तान शृंगाराची नव्या भाषेत आठवण करून देत होता. पण याशिवाय अधिक संकुचित मर्यादा अशी होती की, माणसाच्या सर्व जीवनात हा नवथर तारुण्याचा उन्मादक अनुभव म्हणजेच सर्वकाही आहे, मूल्यवान आहे अशी चुकीची मूल्य-कल्पना जाणता-अजाणता झालेली होती. या कथावाङ्मयात आलेले राजकारण व समाजकारण प्रणयाच्या आदिबंधाशिवाय सुरू होत नव्हते व संपत नव्हते. याचा संबंध सुखवादी मनाशी आहे.

मराठी नवकथेने प्रणयभावनेला तिलांजली दिली नव्हती, पण प्रणयाभोवतीच्या साचेबंद कल्पनांना मूठमाती दिली होती हे निश्चित. याचे कारण असे की नवे कथाकार माणसाच्या मनाकडेच आता मुक्तपणे पाहात होते. त्यांच्या मनात माणूस सुष्ट किंवा दुष्ट असतो, तो मूलतः चांगलाच असतो वा मूलतः वाईटच असतो अशा प्रकारची गृहीत कृत्ये दिसत नाहीत. याचा संबंध तत्कालीन साहित्यिक व वैचारिक वातावरणात असलेल्या मानसशास्त्रज्ञांच्या विचाराशी लावता येतो तसाच मोकळेपणाने पाहण्याच्या दृष्टीशीही लावावा लागतो. हा मनाचा मुक्तपणा स्वातंत्र्येच्छू तरुण मनाचे वैशिष्ट्य होते. मराठी कथेने परंपरागत कथानकाचे दडपण झुगारून दिले आणि माणसाचा वैविध्यपूर्ण स्वभाव, मनोवृत्ती, गतिशील संज्ञाप्रवाह यांना महत्त्व दिले. यासाठी नव्या प्रयोगांना महत्त्व आले. नव कवितेने छंदांचीच बंधने

झुगारून दिली असे नव्हे तर काव्यवस्तूकडे पाहण्याच्या परंपरागत एकेरी वृत्तीलाच अव्हेरिले. ( या ठिकाणी एक वैशिष्ट्य नोंदवावेसे वाटते—साहित्यातील नव्या प्रवाहांची सुरुवात प्रथम कविता व कथा या लघु-अवकाश असणाऱ्या साहित्यप्रकारांत होते. नंतर कादंबरीसारख्या प्रकारावर त्याचा परिणाम होतो. ) या सर्व बंधमुक्ततेच्या प्रयत्नात समाज व व्यक्ती यांच्या संबंधांत व्यक्तीला महत्त्व देणाऱ्या व्यक्तिवादाचे महत्त्व नाकारता येणार नाही. सुखवादाशी समझोता करणारा कलावाद व नव-साहित्याच्या मुळाशी असलेला स्वानुभूतीच्या प्रामाणिक आविष्काराचा आग्रह यांतला फरक लक्षात घ्यायला हवा. कलावादाने जीवनातल्या विद्रूपाकडे सरळ सरळ डोळेझाक केली. त्या विद्रूपाकडून गुलगुलित प्रणयाकडे धाव घेतली किंवा त्या विद्रूपाचे प्रत्यक्ष दर्शन न घेता ते तात्त्विक व वैचारिक पातळयांवरून घेण्याचा प्रयत्न केला. मराठी साहित्यावर स्वातंत्र्यपूर्ण काळापर्यंत पडलेल्या साम्यवादी व गांधीवादी प्रभावांचे परीक्षण केले तर असे दिसेल की, साम्यवादाचे वैचारिक आकर्षण मजुरांच्या जीवनाच्या प्रत्यक्ष वास्तवाबद्दल फारसे औत्सुक्य निर्माण करू शकले नाही, व साम्यवादाची बौद्धिक चर्चा ललित कृतीत घुसली.[१] साम्यवादाजवळ वैचारिक दृष्ट्या जाऊनही मराठी लेखक मागे परतले.[२] गांधीवादाचे आवाहन खेड्यांतील शेत-कऱ्यांच्या व हरिजनांच्या जीवनातील उग्र दर्शन घेऊ शकले नाही.[३] नव साहित्याने स्वतःच्या काहीशा सीमित वास्तववादी दृष्टीने का होईना पण मानवी मनातील विद्रूप पाहिले. माणसाचा फालतूपणा, फाटकेपणा, हलकेपणा व क्षुद्रपणा यांचे विरूप दर्शन नव-साहित्याने करून दिले. माणसाच्या आध्यात्मिक व धार्मिक निष्ठांचा सपकपणा स्पष्ट केला. प्रणयाचे रोमँटिक भडक रंग किती विटके आहेत याचे चित्रण केले. उदात्त व दिव्य भावनांचा व जीवनमूल्यांचा आत्मलुब्ध करणारा वरपांगीपणा स्पष्ट केला. माणसाच्या मनातील सूक्ष्मतर जटिल, गुंतागुंतीच्या, मनो-वृत्तींचा वेध घेण्याची नवकथेची व नवकवितेची ताकद मान्य न करणे कृतघ्न-पणाचेच नव्हे तर अंधपणाचे ठरेल. मराठी साहित्यापुरते बोलायचे तर नव-साहित्याचा हा उन्मेष कथा व कविता यांपुरता मर्यादित होता व तिथून तो कादंबरी या वाङ्मयप्रकाराकडे झिरपून गेली. साहित्यिक परंपरांशी व मध्यम वर्गीय जुनाट संस्कारांशी असलेले गाडगीळ मर्ढेकरांचे प्रश्नचिन्हांकित तिरकस नाते लक्षात घेतले तरच मराठी कादंबरीत पुढे आलेला, ' जनरेशन गॅप'मुळे अधिक तीव्र झालेला परंपराभंजनाचा टोपीउडवा विद्रोहीपणा समजू शकतो. स्पष्टपणे सांगायचे तर गाडगीळ-मर्ढेकरांच्या लघुकथा-काव्याच्या पृष्ठभूमीच्या अभावी भालचंद्र नेमाड्यांचा बाज उभा राहिला नसता.

पण नव-साहित्याला एवढे देणे देऊन टाकल्यानंतर काही मर्यादांची दखल घ्यायला हवी. नवसाहित्यात एक वैचारिक गृहीत कृत्य असे होते की कलावंत हा स्वयंभू

असतो व त्याचे व्यक्तित्व हे पुष्कळसे नियतिकृत असते. फ्रायडच्या आधाराने मर्ढेकरांनी हेही सांगून टाकले की, कलावंताच्या बालपणातील चारपाच वर्षांच्या काळात त्याच्यावर होणाऱ्या प्रभावांनी व त्याच्या जीवनात घडलेल्या घटनांनी त्याचे व्यक्तित्व बनत असते व पुढे ते बदलण्याची शक्यता नसते. ही दृष्टी जाणता अजाणता सर्वच कथाकारांनी स्वीकारलेली दिसते. त्याचा परिणाम असा झाला की, बदलत्या वास्तवाशी द्वन्द्वात्मक भूमिकेतून सामोरे जाण्याच्या जिद्दीपेक्षा बाह्य वास्तवातील काही घटितांना आपल्या बनलेल्या दृष्टीतून टिपणे एवढेच कलावंताचे कार्य आहे असा ग्रह करून घेतला गेला. त्याचप्रमाणे पुष्कळशा कथा मागे वळून पाहण्याच्या प्रवृत्तीतून निर्माण झाल्या. तिसरा परिणाम असा की घडून गेलेल्या घटनांचे (यात जीवनात येऊन गेलेल्या व्यक्तीही आल्या) मानसिक कार्यकारण संबंध पाहण्यात लेखक अधिक रस घेऊ लागले. एखादी कथा सहजपणे लिहिली गेली आहे या बाबीला विनाकारण मूल्यात्मक महत्त्व आले. यात दुर्लक्षित झालेला भाग हा : लेखकाचे व्यक्तित्व हे अहर्निश, प्रत्येक क्षणी घडत असते आणि या घडण्यासाठी लेखकाने सतत प्रयत्नशील राहिले पाहिजे, हा प्रयत्न सतत जागरूक राहण्याच्या प्रक्रियेत संभवतो, यासाठी अनेक प्रकारचे जीवघेणे खेळ लेखकाला करावे लागतात. या गोष्टीकडे पूर्ण दुर्लक्ष झाले. याशिवाय वास्तवाशी द्वंद्वात्मक संबंध असलेला व्यक्तित्ववान लेखक वास्तवालाही आपल्या विशिष्ट दृष्टीने सूक्ष्मपणे पण दृढपणे बदलत असतो ही अस्मिता नवसाहित्यात क्षीण स्वरूपात आढळते. समाजाच्या मेंदूच्या ठिकाणी असलेल्या बुद्धिजीवी वर्गाच्या मानसिकतेला हादरे देण्याचे व त्यातील संकल्पना-संवेदनांची पुनर्रचना करण्यास भाग पाडण्याचे सामर्थ्य ललित साहित्यिकाजवळ असू शकते हा आत्मविश्वास नव साहित्यिकांत क्षीणपणे आढळतो. यातून एक प्रकारची आत्मरतता व मरगळ येते. हा मराठी मनाला लागलेल्या सुखवादाच्या किडीचा परिणाम आहे.

व्यक्तित्ववान असणे आणि व्यक्तिकेंद्रित वा आत्मकेंद्रित असणे यांतील फरक सदैव डोळ्यांसमोर ठेवला नाही तर साहित्यात चुकीचा व्यक्तिवाद फोफावतो. मराठीतील ऐतिहासिक कथा-कादंबऱ्यांची व नाटकांची साक्ष काढली तर ही गोष्ट अधिकच स्पष्ट होते. मराठीतील ऐतिहासिक कादंबऱ्यांच्या मागे पुनरुत्पादनाची प्रेरणा स्वातंत्र्यपूर्व काळात असणे स्वाभाविक होते. हरिभाऊंमध्ये स्वभावधर्म म्हणून असलेली समाजदर्शनाची प्रवृत्ती पुढच्या गाजलेल्या ऐतिहासिक कादंबऱ्यांतून दिसत नाही. हडपांना समाजसापेक्ष ऐतिहासिकतेची जाणीव होती, पण ते सामान्य कलावंत होते. मराठीची ऐतिहासिक कादंबरी इतिहासात बऱ्यावाईट ठरलेल्या महत्त्वाच्या व्यक्तींबद्दलतेचे आलेख काढते, पण त्या व्यक्ती ज्या समाजात निर्माण झाल्या व त्यांच्या कर्तृत्वाचे, बऱ्यावाईट स्वभावाचे जे धागेदोरे तत्कालीन सामाजिक वास्तवात

गुंतले होते व त्या वास्तवामुळे विशिष्टपणे आकारित झाले होते त्या वास्तवाचे सर्वस्तरीय चित्रण ही ऐतिहासिक कादंबरी करीत नाही. गो. नी. दांडेकरांचे उदाहरण घेण्यासारखे आहे. त्यांचे इतिहासकालीन सामाजिक वास्तवाचे ज्ञान इतर ऐतिहासिक कादंबरीकारांच्या तुलनेने अधिक व्यापक आहे, पण सामाजिक वास्तवाच्या समग्रतेची सखोल जाणीव नसल्यामुळे काय घडते ते पाहण्यासारखे आहे. शिवरायांनी प्रचण्ड उद्योग केले. त्यांचे मोठे रोमहर्षक वर्णन गो. नी. करतात, पण ज्या आर्थिक आधारावर हे प्रचण्ड उद्योग चालतात तिकडे त्यांचे लक्षच जात नाही. अशा वेळी मराठी ऐतिहासिक कादंबरीकार कुठे मोहरांचा हंडा सापडला, गुप्त तळघरात खजिना सापडला इत्यादी कल्पन्यांचा आधार शोधतात. काही ऐतिहासिक कादंबरीकार व्यक्तींच्या मनाचे पापुद्रे दाखवण्यात उत्साह दाखवतात किंवा एखाद्या व्यक्तीबद्दलची लोकसम्मत प्रतिमा कशी चुकीची आहे हे दर्शविण्यात विद्रोही आनंद घेतात. परंतु त्या ऐतिहासिक व्यक्तीच्या भोवतालच्या सामाजिक वास्तवाचा वेध घेण्यात फारशी शोधक बुद्धी वापरत नाहीत. पण हा एकूण ऐतिहासिक संशोधनाचाच दोष असावा. शिवाजीची भवानी तलवार खरी कोणती, खोटी कोणती, शिवाजी व रामदास भेटले होते काय, शिवाजीबरोबर संभाजी दक्षिणेत आला काय इत्यादी प्रश्नावर जितके वादंग माजतात त्या मानाने त्या काळचा खरा बोध देणारी सामाजिक परिस्थिती कशी होती याचे ऐतिहासिक संशोधन करण्याचा प्रयत्न केला जात नाही. स्वाभाविकपणे ऐतिहासिक कादंबरीकारांना त्या काळचे समग्र भान नसते. म्हणूनच या कादंबऱ्या वा कृती खऱ्या अर्थाने ऐतिहासिक नसतात, त्या ऐतिहासिक व्यक्तींबद्दलच्या असतात.

या नव-साहित्यातील व्यक्तिकेंद्रिततेचा परिणाम मराठी ग्रामीण कथेच्या संदर्भात पाहण्यासारखा आहे. वस्तुतः भारतीय समाजरचनेतील वास्तवात एक फार मोठा विरोध यंत्रसंस्कृतीच्या आगमनापासून निर्माण झालेला आहे. तो विरोध म्हणजे वाढती नगरे व उद्ध्वस्त होत जाणारी ग्रामीण संस्कृती यांचा. मराठी कथेत नव-साहित्यात हे वास्तव त्यातील अन्तर्विरोधाच्या अंगाने आले नाही. ग्रामीण साहित्याची खरीखुरी मुहूर्तमेढ रोवली ती व्यंकटेश माडगूळकरांनी. त्यांचे कसदार व अस्सल ग्रामीण साहित्य आले नसते तर तत्पूर्वीच्या ग्रामीण साहित्याचा नकलीपणा बोचला नसता व पुढल्या विकासाला पार्श्वभूमी मिळाली नसती हे मान्य करायला हवे. पण माडगूळकरांनी ग्रामीण विश्व अगदी सहजपणे मराठीत आणले. प्रा. म. द. हातकणंगलेकरांनी यासंबंधी मोठ्या मार्मिकपणे लिहिले आहे, "१९४५ च्या सुमारास मौज-सत्यकथेतून माडगूळकरांनी अभावितपणे ग्रामीण मराठी कथेत मन्वन्तर घडवले."[४] या ठिकाणी अभावितपणे शब्द मार्मिक आहे. ग्रामीण कथा लिहिण्यासाठी माडगूळकरांना फारसे मोठे आव्हान नव्हते. मराठी नवकथाकार गाडगिळांची

कथा जुन्या परंपरेशी आव्हान देऊन लिहिली जाते. एक प्रकारच्या अन्तर्विरोधी ताण त्यांच्या कथेत दिसतो. माडगूळकरांची कथा कथेचे एक 'एक्स्टेन्शन' म्हणून येते स्वानुभूतीची प्रामाणिक अभिव्यक्ती हा मूळ उद्रेक-बिंदू आहे. माडगूळकरांची कथा वेगळी असली तरी स्वागतार्ह ठरली. मराठी परंपरागत कथासाहित्यात नवीन आव्हाने देणारी ती ठरली का ? माडगूळकरांनी जी माणसे पाहिली त्यांचे वास्तववादी चित्रण केले. ते ग्रामीण जनतेशी एकरूप होऊ शकले नाहीत हे तितकेसे खरे नाही. खरे तर ग्रामीण वास्तवाचा अधिक खालचा स्तर पाहण्याची भेदक दृष्टी त्यांनी दाखवली नाही. म्हणजेच ग्रामीण माणसाच्या विशिष्ट जीवनाचे स्थितिशील रूप त्यांनी पाहिले पण अवकळा आलेल्या विद्रूप जीवनाला विशिष्ट आकार देणाऱ्या घटकांची तपासणी ते करू शकले नाहीत. थोड्याफार फरकाने सर्वच ग्रामीण साहित्याबद्दल हे म्हणता येईल.

ग्रामीण साहित्याला वैचारिक बैठक देऊन व अधिक संगटित स्वरूपात तिच्या अभिव्यक्तीचा मार्ग शोधण्याचा डोळस प्रयत्न अलीकडे होऊ लागला आहे. ग्रामीण कथेच्या अंगभूत वैशिष्ट्यांची व व्यवच्छेदक लक्षणांची चर्चा नुकतीच होऊ लागलेली आहे. या प्रयत्नांची थट्टा उडविण्याचा व ते व्यक्तिगत महत्त्वाकांक्षेतून केले जात आहे असा हेत्वारोप करण्याचा काही मठाधीशांनी प्रयत्न केला. या संदर्भात एकदोन महत्त्वाच्या गोष्टी लक्षात घ्यायला हव्यात. लेखनाची निर्मिती ही वैयक्तिक बाब खरीच, पण तिला विशिष्ट आकार देण्यासाठी, तिची छाप साहित्यावर उमटावी व स्वतंत्र व्यक्तिमत्त्व प्राप्त व्हावे म्हणून संगठित प्रयास करणे हे फारसे नवे नाही. पाश्चात्त्य वाङ्मयातल्या इमॅजिझम, सिंबॉलिझम, दादाइझम इत्यादी वाङ्मयीन प्रवाहांच्या पाठीमागे संगठित प्रयत्न होते व मराठीतल्या दलित साहित्याची प्रचंड चळवळ संगठित रीत्या चालवली गेली नसती तर काय झाले असते हे सांगायला हवे असे नाही. तेव्हा एखाद्या विचारसरणीला वा वाङ्मयीन प्रवाहाला संगठित रूप देण्याचा प्रयत्न करणे व तिच्या शक्तींचा व मर्यादांचा विचार करणे यात काय गैर आहे ते कळत नाही. 'ग्रामीण साहित्याला सवतासुभा निर्माण करायचा आहे' अशासारखी शब्दावली सामान्य वाचकाला विथरवून टाकते व त्यामागे असणाऱ्या सरंजामवादी मनोवृत्तीचा त्याला पत्ताच लागत नाही. दलित साहित्याच्या संगठित चळवळीने तर मराठी साहित्यात मोलाची भर घातली आहे असे मान्य केले तर ग्रामीण साहित्याची चळवळ का नको ? अशा चळवळीतून काही धोके संभवतात. एकतर विशिष्ट साहित्यिक प्रवाह हीच व तीच एकमेव साहित्याची शाश्वत गंगोत्री आहे हा अभिनिवेश व त्यातून निर्माण झालेली दुसऱ्या साहित्य प्रवाहांबद्दलची असहिष्णुता. दुसरी गोष्ट ही की विशिष्ट साहित्यिक प्रभाव हा शेवटी विशिष्ट भाषेच्या साहित्यसागरातला एक प्रवाह आहे आणि त्याला जसा उगम आहे तसा विलीनत्वाचा

अंतही आहे ही समंजस जाणीव न ठेवल्यामुळे आलेला अहंकार. हा अभिनिवेश, ही असहिष्णुता व हा अहंकार दुर्दैवाने दलित साहित्यात निर्माण झाला आहे. त्या मानाने ठेच लागून शहाणे झालेले ग्रामीण साहित्याचे नेतृत्व यासंबंधी अधिक जागरूक दिसते. आनंद यादव 'साहित्यातील ग्रामीणता' या निबंधात ग्रामीण साहित्याच्या व्यवच्छेदक लक्षणांची मीमांसा करताना खानोलकरांच्या 'सनई' कथेला ग्रामीण नाही असे म्हणूनही स्पष्ट लिहितात, "...कथेचा आत्मा ग्रामीण वाटत नाही. ती एका व्यापक मानवी मनाची कथा होते." [५] पुढे ते स्पष्ट करतात, "पण ती खास ग्रामीण झाली नाही म्हणून काही बिघडत नाही. लेखकाच्या व्यक्तिमत्त्वाचा हा प्रश्न असतो. कोणतीही कथा ग्रामीणतेमुळे मोठी अथवा छोटी ठरू शकत नाही. ती फक्त 'ग्रामीण कथा' असते एवढेच इथे सुचवायचे आहे." [६] अशीच समंजस भूमिका आनंद यादव जी. ए. कुलकर्णी यांच्या राधीबद्दल घेतात. या लेखात प्रकट झालेली साहित्यातील जाण, ग्रामीण साहित्याची खास वैशिष्ट्ये व तिचा असा चेहरा शोधताना दिसणारी सहिष्णू, वस्तुनिष्ठ आणि जिज्ञासू वृत्ती, मर्यादांचे भान ठेवण्याचा विवेक या गोष्टी लक्षात घेतल्या तर ग्रामीण साहित्याच्या या सवत्यासुभ्याबद्दल सवतीमत्सर करण्याचे कारण नाही.

मात्र आनंद यादवांनी ग्रामीण साहित्याच्या स्वरूपाविषयी व्यक्त केलेल्या ज्या आकांक्षा आहेत, त्या ग्रामीण साहित्यात आज तरी फारशा प्रतिबिंबित झालेल्या दिसत नाहीत. ग्रामीण हेतुकल्पना असलेली, ग्रामीण वास्तवाचे अनेक पातळींवरचे वास्तव चित्रित करणारी व त्या वास्तवातील अनेक पदरी संघर्ष व ताण व्यक्त करणारी ग्रामीण कथा अजून लिहिली जायची आहे. दुःख वाटते ते या गोष्टीचे की ग्रामीण अनुभवाचे प्रचुर पाठबळ असणारे खंदे कथाकार यश, अर्थ, प्रतिष्ठा इत्यादी मोहांना बळी पडत आहेत किंवा नागर जीवनातले काही मोह त्यांची दिशाभूल करीत आहेत.

या ग्रामीण कथेच्या चळवळीबद्दल आक्रोश का? दलित साहित्याच्या झुंजारपणाने पांढरपेशा सुखवादी व आत्मकेंद्रित मनाला एक जबरदस्त धक्का दिला. पांढरपेशा वर्गात एक प्रकारची अपराधीपणाची भावना उत्पन्न झाली व या वर्गासाठी काही करायला हवे याची जाणीव उत्पन्न केली. ग्रामीण साहित्याच्या चळवळीमुळे असाच दुसरा हादरा बसण्याची शक्यता आहे. या संभाव्य धोक्याची जाणीव होऊन तर पांढरपेशा मनाने जाणता अजाणता ही विरोधाची भूमिका घेतली नसेल! दलित साहित्याच्या काळात अशीच भूमिका घेतली गेली होती याची आठवण या ठिकाणी करून दिली पाहिजे.

ग्रामीण साहित्याची आव्हाने अशीच प्रचण्ड आहेत. आतापर्यंत निर्माण झालेले ग्रामीण साहित्य बव्हंशी मागे वळून पाहण्याच्या रोमँटिक वृत्तीतून निर्माण झालेले

आहे. तसेच ग्रामीण घटनांचा व चरित्रांचा विनोदाची खसखस पिकवण्याच्या उद्देशाने वापर केलेला आहे. हे साहित्य ग्रामीण संस्कृतीशी जिवंत व संघर्षमय संबंध संपलेल्या लेखकांनी अर्थात खेड्यातून शहरात आलेल्या लेखकांनी निर्माण केलेले आहे. या साहित्यावर पांढरपेशा साहित्यिक परंपरांची दाट छाया आहे मराठी साहित्याच्या पांढरपेशी साहित्यिक संस्कृतीचे एक वैशिष्ट्य असे आहे की, यातील स्फोटक स्वरूपाचे व मनावर आघात करणारे नसून काहीसे कुरवाळण्याच्या मनोवृत्तीतून निर्माण झालेले आहे. दलित साहित्याने हेतुपुरस्सर पांढरपेशा संस्कृतीची विरोधाची व विद्रोहाची भूमिका घेतल्यामुळे दलित साहित्यातील दुःख मनाला झिणझिण्या आणणारे झाले आहे. ग्रामीण साहित्याचा वाचकवर्ग बव्हंशी नागरिक वर्गच आतापर्यंत असल्यामुळे ग्रामीण साहित्यावर या वाचकवर्गाच्या आवडीनिवडींचा अप्रत्यक्ष प्रभाव पडणे स्वाभाविक होते. कारण लेखकाच्या वाचकवर्गाचा व लेखकाच्या लेखनाचा संबंध घनिष्ठ असतो. लेखकाची स्वायत्तता या वर्गामुळे खूपच मर्यादित केलेली असते याचा विसर बऱ्याच लेखकांना पडलेला असतो.

मराठी पांढरपेशा साहित्यिक परंपरांचे दुसरे वैशिष्ट्य असे की आजवर सभोवतालच्या बाह्य वास्तवाचे खरे रूप न्याहाळण्याचे या साहित्याने टाळले आहे. स्वातंत्र्योत्तर काळात भारताला तीन वेळा परदेशांशी मुकाबला करावा लागला. चीनबरोबरच्या युद्धात भारताची विलक्षण नामुष्की झाली. पाकिस्तानबरोबरच्या एका युद्धात ही जाणीव थोडी कमी तीव्र व्हावी अशा घटना घडल्या. बांगला देशाला जन्म देण्याचे श्रेय भारताला मिळाले. पण आमचे साहित्यिक या घटनांनी कितीसे हलले ? पानशेतचे धरण फुटण्याने फक्त प्रचण्ड आर्थिक हानीच झाली असे नाही तर अनेक कुटुंबांची घडी पार विस्कटली. यात फक्त नैसर्गिक अवकृपाच नव्हती तर आमच्या सामाजिक व राजकीय जीवनातली दिवाळखोरी व भ्रष्टाचार असण्याची शक्यता होती. यांतले कारुण्य व क्रौर्य मराठी साहित्यिकांना स्पर्श करू शकले काय ? त्यानंतर एका तडफेच्या प्रशासकाने विस्कटलेल्या जीवनाची पुनर्रचना केली त्यातले वीरनायकत्वही आम्हाला दिसले नाही. मराठी मनाला सामाजिक जीवनात नवा आशय निर्माण करणाऱ्यांचे चैतन्यही निर्मितीला आव्हान करू शकत नाही. ते ऐतिहासिक काळातले असावे लागते ! महाराष्ट्रातल्या प्रचण्ड दुष्काळाने भल्याभल्यांना रस्त्यावर आणले व केवळ जगण्यासाठी खडी कुटण्यासारखी शारीरिक श्रमाची कामे करायला लावली व त्याच वेळी आमच्या जनमनातही मदतीचा हात देण्यासाठी चैतन्य उत्पन्न झाले. या दोन्ही गोष्टींची आमच्या संवेदनशील मनाने ( ! ) फारशी दखल घेतली नाही. सरकारी यंत्रणा, नोकरशाही, व्यापारी नीती, नवश्रीमंतांची उर्मट बाजारबसवी संस्कृती, परकीयांच्या सूक्ष्म आक्रमणांची नानाविध रूपे, सरकारी व सामाजिक नेतृत्व, विद्यार्थ्यांच्या चळवळी, कामगारांतील प्रचण्ड

अनुक्रमणिका

असंतोष, काही तुरळक तरुणांचे नवनिर्माण करण्याचे प्रयत्न—या व अशा कितीतरी नाट्यात्मक घटना साहित्यिकांच्या स्पर्शाविना इतिहासजमा होत आहेत. स्वातंत्र्योत्तर भारतात सामाजिक व राजकीय वास्तवाची कितीतरी विद्रूप अंगे हर क्षणी उघडी होत आहेत व त्याचबरोबर काही नवे निर्माण करणारे वीरनायकत्वही विरळपणे का होईना पण डोळे उघडे ठेवून पाहिल्यास दिसण्याची शक्यता आहे. पांढरपेशा लेखनाशी याचा संबंध का आला नाही ? स्वतःला स्वयंभू कल्पकतेचे धनी समजणारे प्रतिभावंत स्वतःला जाणवणार तेवढच लिहिणार. जाणिवांचा परीघ वाढविता येतो व वाढवला पाहिजे असे आत्मकेंद्रित लेखकांना वाटत नाही.

या अनुभवाचा परीघ वाढवण्याचा काही पांढरपेशा लेखकांनी एका विशिष्ट दृष्टीने प्रयत्न केलेला दिसतो. हा त्यांचा मार्ग दारिद्र्यात खितपत पडलेल्या श्रम-जीवींच्या जीवनाच्या जवळपास जात नाही. बाटली आणि बाई, हशीश आणि एल. एस. डी. यांचा अनुभव घेण्यासाठी हे फार उत्सुक असतात. यांच्या साहित्यात काही गमतीदार कल्पना असतात. बाटलीमागून बाटली रिचवताना व बायांबद्दल मध्यमवर्गीय शालीनतेची भाषा सोडून लिहिताना त्यांना कृतकृत्य वाटते. मधूनच वैश्विक सत्याचा शोध घेण्याची व मानवी जीवनाच्या भवितव्याबद्दलचा विकल 'कन्सर्न' व्यक्त केला की यांना आपल्या कृतीला वैश्विक स्तर आल्याचा भास होतो. यातली छद्म-मुद्रा वाचकांनी व समीक्षकांनी लक्षात घ्यायला हवी. अशा लेखकांच्या भाषिक कृतीचा अधिक सावधपणे विचार करायला हवा. पांढरपेशा संस्कृतीच्या वळणावरून जाताना समाजाशी बांधिलकी वाटणाऱ्या साहित्यिकांनी अधिक चवकसपणे विचार करायला हवा.

ग्रामीण साहित्य अजून खऱ्या अर्थाने ग्रामीण झाले आहे असे वाटत नाही. त्या लेखनावर सुखवादाची साय पसरलेली दिसते, दुःखांना कुरवाळण्याची वृत्ती प्रबळ झालेली दिसते. दुसरे कारण अधिक समाजशास्त्रीय आहे. दलित साहित्य नागर जीवनात राहूनही काही मर्यादेपर्यंत लिहिता येणे शक्य आहे, कारण नागर जीवनात सुशिक्षित दलिताला कोंडमाऱ्याचा अनुभव येतो. ग्रामीण युवक शहरात आल्यावर मध्यमवर्गीय संस्कृतीला कवटाळू लागतो. आता शहरांची ग्रामीण युवकांना पोटात घेण्याची कमाल मर्यादा गाठली गेली आहे. ग्रामीण युवकांसाठी गावातच काही संधी उपलब्ध होऊ लागली आहे–काही क्षेत्रे ग्रामीण जीवनाच्या आसपास खुली होऊ लागली आहेत. मला वाटतं शिकलेली परंतु गावातच राहायला भाग पडलेली पहिली पिढी आताच निर्माण झालेली आहे. यातूनच ग्रामीण साहित्य लिहिले जाण्याची शक्यता आता वाढली आहे. या ग्रामीण युवकांचे खास प्रश्न आहेत व त्यासाठी संगठित प्रयत्न झाले तर ते एकूण मराठी साहित्याच्या विकासाच्या दृष्टीने महत्त्वाचे ठरणार आहे. ग्रामीण जनतेत साक्षरतेचे प्रमाण वाढले आहे. त्यांना

अनुक्रमणिका

त्यांचे असे वाङ्मय हवे आहे. शेवटी साहित्य समाजाच्या संदर्भातच विकसित होते. ग्रामीण जनतेच्या साक्षरतेचा व शिक्षणाचा आणि ग्रामीण साहित्याचा समवाय संबंध लक्षात घेतला पाहिजे. ग्रामीण साहित्यकारांनी आपला वाचकवर्ग वाढविण्याच्या प्रयत्नाचाही लाभ करून घेतला पाहिजे.

ग्रामीण साहित्य खऱ्या अर्थाने लिहिले गेले पाहिजे म्हणजे नेमके काय? ग्रामीण संस्कृतीवर आज अनेक प्रकारचे आक्रमण होत आहे. उद्योगप्रधान संस्कृती, गावाकडून मनुष्यशक्ती शोषून घेणारी शहरे, शहरी संस्कृतीतल्या विदेशी कृत्रिम संस्कृती यांची आक्रमणे होत आहेत. वाढत्या उद्योगांसाठी जंगली संपत्ती नष्ट करणाऱ्या ठेकेदारांचे निर्दय आक्रमण आहेच. गावांतील जमीनदारांचे व श्रमिकांचे अन्तरसंघर्ष आहेत. स्त्रियांच्या शोषणाची अनेकविध रूपे आहेत. जीवनाचा निकोप आनंद देणाऱ्या गावच्या मातीशी इमान राखणाऱ्या चालीरीतींवर, उत्सवांवर सुशिक्षितांच्या नकली रीतिरिवाजांची कुरघोडी होत आहे. माणसाचा जमिनीशी असलेल्या प्रत्यक्ष संबंधातून निर्माण झालेला सहज निर्व्याजपणा नष्ट होऊ लागलेला आहे. जातिव्यवस्थेचा संस्कार पुसून टाकण्याची आवश्यकता मान्य करूनही हजारो वर्षांच्या रक्तात मुरलेल्या विषाप्रमाणे ते संस्कार ग्रामीण समाजाला अस्वस्थ करीत आहेत. राजकीय डावपेच या जातिबंधांना अधिक स्थिरत्व देण्याच्या दृष्टीने आखले जात आहेत. यासंबंधी कणखर भूमिका घेण्याची आवश्यकता निर्माण झाली आहे. या वेळी ग्रामीण संस्कृती, रीतिरिवाज, उत्सवपर्व, भाषा यांचा मूलगामी विचार करण्याची आवश्यकता आहे. योग्य ती अस्मिता आणि नव्या जीवनपद्धतीला सामोरे जाण्याच्या गतिशीलतेचे भान या दोहोंचा विवेकयुक्त मेळ करण्याची कडोविकडीची वेळ येऊन ठेपली आहे—now or never, या व अशा समस्यांचे चिंतन ग्रामीण साहित्याला करायचे आहे. हे चिंतन बौद्धिक असेल वा कला-माध्यमातून असेल. शेवटी साहित्यातील चिरंतनता लेखकाच्या प्रतिभेबरोबरच त्याची वर्तमान क्षणाच्या स्पंदनशील, चैतन्ययुक्त जीवनाशी किती दृढ व उत्कट बांधिलकी आहे यावरच अवलंबून असते.

मराठी दलित साहित्याने मराठी साहित्याला एक जबरदस्त आव्हान दिले. मराठी पांढरपेशी सुखवादी साहित्याला मिळालेला हा सर्वांत मोठा धक्का आहे आणि या धक्क्याने अनेक विचारवंतांना आपल्या टीकाविचाराचा नव्याने फेरविचार करण्याची गरज भासली आहे. दलित साहित्याचा माझ्या दृष्टीने थोरपणा वैयक्तिक दलित कृतींच्या मोठेपणात नसून सामूहिक रीत्या या साहित्याने मराठीत उत्पन्न केलेल्या वैचारिक व संवेदनात्मक स्पंदनामध्ये आहे. ही साहित्यिक चळवळ संगटित झाली नसती व तिने आपल्या अस्मितेचा शोध घेतला नसता, आपल्या चेहऱ्याची ओळख करून घेतली नसती तर मराठी पांढरपेशा साहित्यिक परंपरांनी एकट्या

दुकट्या लेखकाला या लेखनकृतीत पचवून टाकले असते. दलित साहित्याने एकूण मराठी परंपरेशीच संबंध तोडून टाकण्याची अतिरेकी भूमिका घेतली. (त्याचा एक परिणाम असा झाला की, कालदृष्ट्या प्रगतिशील असणाऱ्या साहित्यिकांच्या विचारां तला नेमका कालसापेक्ष संकुचित भाग शोधून काढून त्यांच्या अन्य मानववादी विचारांकडे पूर्णपणे दुर्लक्ष करण्याचा पद्धतशीर प्रयत्न होऊ लागला. चळवळ बांधण्यासाठी डावपेचाच्या दृष्टीने हे ठीक असले तरी सत्याचे व्रत घेतलेल्या विचार-वंतांच्या दृष्टीने हाही एक भोंदूपणा आहे.) या अतिरेकी भूमिकेतून स्वतंत्र मार्ग चोखाळण्यासाठी लागणारी ताकद व आत्मविश्वास या साहित्य-प्रवृत्तीत निर्माण झाला. हे दडपलेल्यांचे आत्मनिवेदन असल्यामुळे त्याला अभावितपणे मानवीय पातळी सहजपणे उपलब्ध झाली. त्यांचा नकार, विद्रोह व घृणा अन्यायाविरुद्ध असल्यामुळे त्यांच्या अनुभवात सहजगत्या मूल्यात्मक आधार लाभला. दलितांनी मागे वळून निवेदित केलेले अनुभव स्फोटकच राहिले. एवढेच नव्हे तर शिक्षणातून आलेल्या सजगपणामुळे त्यातील मुळांतले वास्तव अधिक दाहकपणे जाणवू लागले. कारण त्या अनुभवांच्या कडा भारतीय जाति-व्यवस्थेत अजूनही घासल्या जाऊन गुळगुळीत होण्याची शक्यता निर्माण झाली नाही. काळाच्या औषधामुळे दुखऱ्या जाणिवांच्या कळा सत्य होण्याची शक्यता नव्हती. अर्थात भोगलेल्या दुःखाला गोंजारीत बसण्याची शक्यता निर्माण झाली नव्हती. या दुःखद जाणिवांची स्फोटक-पणे पुनरावृत्ती होत असते ते खरे आहे. यातून जुन्या दुःखाचे रवंथ करीत बसण्याचा स्वभावधर्म झाला तर व्यक्तित्व शिलीभूत होण्याची शक्यता आहे. या लेखनात बहुरूपीपणा नाही. वेगवेगळ्या भूमिकेतून जीवनानुभवाकडे पाहण्याची लेखकाला आवश्यक असणारी सिद्धी कमी दिसते. आम्ही व तुम्ही या सर्वनामांच्या मागून येणारी वर्गीय दृष्टी एकसाचेपणा आणते. क्रोध व आक्रोश यांच्या सर्वव्यापित्वामुळे अन्य अनुभूतींचे वैविध्य नष्ट होण्याची शक्यता आहे. निसर्गाविषयी हे साहस फार उदासीन दिसते. याबरोबर आणखी एक मोठा दोष येऊ पाहतो आहे असे वाटते. 'बलुतं' या गाजलेल्या आत्मचरित्राच्या आधारे तो स्पष्ट करता येईल. हे एक मराठीतले उत्कृष्ट आत्मचरित्रात्मक लेखन आहे हे सर्वमान्य आहे. 'बलुतं'चा नायक एकदा आपल्या वृद्ध, विकलांग, महारोगाने गांजलेल्या, भीक मागणाऱ्या मावशीला पाहतो. कलात्मक मूल्यांच्या दृष्टीने हा प्रसंग विलक्षण बोलका केला आहे यात शंका नाही. लेखक ओळख न देताच निघून जातो. त्याच्या मनात आपण काहीसे पांढरपेशा झाल्याची बोचक खंत आहे. हेही स्वाभाविक आहे. पण इथेच एक प्रश्न निर्माण होतो. प्रश्न असा आहे : काही वर्षांत वर्ग बदलल्यावर लेखकाची दृष्टी बदलते, त्याच्यातला माणुसकीचा गहिवर कृतिशीलतेचे रूप न घेता खंत व अपराधीपणाच्या अंगाने निष्क्रियतेत पर्यवसित होतो. मानवी जीवनात ही काहीशी

बधिरता अटळ असते काय? ही मर्यादा अटळ असते काय? तसे असेल तर सर्वच थरांवर त्याबद्दलची समंजस जाणीव ठेवायला हवी. काही थोड्याशा वर्षांत एकाच माणसामध्ये जर अशी निष्क्रियता वा उदासीनता येत असेल तर हजारो वर्षांच्या सवईने निष्क्रिय झालेले पांढरपेशांचे मन दलितांकडून समंजस प्रतिक्रियांची अपेक्षा करते एवढेच इथे सुचवायचे आहे. दलित साहित्याने सामूहिकपणे केलेली वाटचाल इतकी महत्त्वाची आहे. यापुढचे त्या साहित्य-प्रवाहाचे भवितव्य या संगठनेच्या दृढतेवर व अस्मिता टिकवून धरण्यावर अवलंबून आहे. या ठिकाणी आणखीही एक गोष्ट सांगावीशी वाटते. दलितांनी आपले स्वतःचे अनुभव काव्य, कथा, कादंबरी यांच्या रूपाने व्यक्त केले ते इतके वेगळे व नवीन होते की त्यांचे सहज प्रकटीकरण मनाला भिडणारे होते. पण हे फोडिले भांडार रिते झाल्यावर? आपले चरित्रात्मक अनुभव सांगण्याचा उत्साह कौतुकास्पद आहे. पण त्यानंतर? हा प्रश्न अन्तर्मुख होऊन विचारायला हवा. यासाठीच भोगलेल्या दुःखांच्या पलीकडे जाऊन त्यांना नवे नवे आकार देणारे परकायाप्रवेशाच्या सिद्धीने नित्य नवीन अनुभवांचा मागोवा घेऊ शकणारे कल्पनेचे यंत्रही कार्यक्षम राहील याची काळजी घेतली पाहिजे. सामाजिक वास्तवाचा वेध घेताना नुसते अनुकरणात्मक वाङ्मय निर्माण होऊ नये असे वाटत असेल तर कल्पनाशक्तीची जोपासना करायलाच हवी. अन्यथा हा धोका सर्वच सामाजिक वास्तवाभिमुख साहित्याच्या बाबतीत संभवतो.

मराठीच्या नागर साहित्यावर एका बाजूने सामाजिक वास्तववादी प्रभाव वाढू लागल्याची सुचिन्हे दिसत आहेत, तर दुसऱ्या बाजूने अस्तित्ववादाच्या नावाने काही वृत्तिविशेषांचा प्रभाव पडत आहे. सामाजिक वास्तववादी कादंबरीने समस्यात्मक जीवनाचे चित्रण करण्याचे व्रत घेतले आहे. मात्र त्याचे रूपान्तर अनुकरणवादी वास्तवचित्रणात होण्याचा धोका आहे. विशेषतः मानवी जीवनातील उदात्त, करुणा-पूर्ण व शोकात्म अनुभवांची अभिव्यक्ती जेव्हा व्यावहारिक भाषेपेक्षा वेगळ्या 'लिरिकल' पातळीवरून होणे अपरिहार्य बनते. अशासाठी भाषेची शक्ती वाढवण्या-साठी प्रतिमा व प्रतीकांची विपुल निर्मिती लेखकाला करावी लागते, लयबद्धता अप-रिहार्यपणे येते. ही भाषा व्यावहारिक जीवनापेक्षा वेगळी वाटली तरी मानवी सृजन-शीलतेचा प्रचण्ड उन्मेष तिथे दिसून येतो. अशा भाषेविषयी सामाजिक वास्तववादी भूमिकेतून जर असहिष्णुता निर्माण झाली तर साहित्यातील समृद्धी नाकारण्या-सारखे ते करंटेपण ठरेल. 'लिरिकल' पातळी गाठणाऱ्या अनुभवांबद्दलचा ही असहिष्णुता मानवी सृजनशीलतेचा अपमान ठरेल.

अस्तित्ववादी वृत्ति-विशेषांचा आविष्कार करणारी प्रवृत्ती मानवी-स्थितीचे जे चित्रण करीत आहे ते परकी आहे असा आरोप करणे चुकीचे ठरेल. मध्यमवर्गीय मनाच्या एकटेपणाचे, परात्मपणाचे आणि मानसिक विकृतींचे चित्रण सहजपणे

व्हावे अशी आजची भारतीय स्थिती निश्चितच आहे. पण ते निष्क्रिय व्यक्तींच्या यथास्थितिवादी मनोवृत्तीचे द्योतक ठरते. त्रिशंकुसारख्या झालेल्या मनाचे हे अटळ दुर्भाग्य आहे. ( मात्र सामाजिक वास्तववादी दृष्टी व साहित्याचे संस्कार करण्याचे सामर्थ्य स्वीकारणाऱ्यांनाही अशा साहित्याबद्दलची भूमिका अधिक विवेकाने घ्यावी लागेल. ) संस्कृतीच्या नावावर असलेल्या बाह्य रीतिरिवाजांचा पोशाखीपणाचा व असामाजिक तत्त्वांचा पडणारा प्रभाव पाहून असे वाटते की पुनः मध्यम वर्गाला आपल्या अस्मितेचा शोध घ्यावा लागेल. खरे म्हणजे आज जे नागर साहित्य लिहिणारे भारतीय मन आहे तेच दुभंगलेल्या अवस्थेत आहे. या नागर मताने पाश्चात्त्य संस्कृतीचा झालेला आघात अजून पचविलेला नाही.

( दि. १, २, ३ मे १९८१ रोजी ' प्रवरानगर ' येथे झालेल्या ' तिसऱ्या ग्रामीण साहित्य संमेलना'त वाचलेला निबंध. )

---

१. पाहा – " भारतीय लेखकाचे मन " लोकवाङ्मय ( दिवाळी अंक १९७६ ) चंद्रकांत बांदिवडेकर

२. साम्यवाद आणि मराठी कादंबरी नवभारत

३. गांधीवाद आणि मराठी कादंबरी नवभारत

४. मराठी ग्रामीण कथेतील टप्पे : एक टिपण : महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका पृ. ५१

५. साहित्यातील ग्रामीणता–आनंद यादव : महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका पृ. २९

६. " " पृ. ३०

# परमात्मा आणि मानवीयता यांच्यामधील शोकात्म संघर्ष : मनोहर तल्हार यांची ' माणूस '

या. वा. वडस्कर, नागपूर

स्वातंत्र्योत्तर कालखंडातील दुसऱ्या दशकात वऱ्हाडमधील जनवादी कादंबरी बहरून येते. १९५८ ते १९६७ या दहा वर्षांत भाऊ मांडवकर, उद्धव शेळके, मनोहर तल्हार, वामन इंगळे व बाजीराव पाटील हे आपापल्या पहिल्या कादंबऱ्या प्रकाशित करतात व मराठी कादंबरीच्या इतिहासात एका नवीन वैभवशाली अध्यायाची भर घातली जाते.

मनोहर तल्हार ह्यांची ' माणूस ' १९६३ मध्ये प्रसिद्ध होते. सामाजिक वास्तवातून माणसाच्या वाट्याला येणारी परात्मता ( Alienation ) आणि त्याची निसर्गदत्त मानवीयता यांच्यातील संघर्षाचे करुण-भीषण नाट्य या कादंबरीत चितारले जाते. मनोहर तल्हार ' माणूस ' मध्ये सामाजिक आर्थिक नियततत्ववादाचे ( Socio-economic determinism ) कलात्मक चित्रण करतात. आत्मकरुणा, भावुकता अथवा प्रचारकी सांकेतिकता ह्या दोषांना कुठेही वळी न पडता एका श्रेष्ठ सामाजिक कादंबरीचे लेखन केले जाते. टॉल्स्टॉय, चेकोव्ह, तुर्गेनेव, डोस्टोव्स्की किंवा गोर्की यांच्या पंक्तीस शोभून दिसावी एवढ्या तोलाची ही कादंबरी थोर रशियन कलावंतांप्रमाणेच तटस्थपणे, अलिप्तपणे, दयाबुद्धीच्या आहारी कुठेही न जाता; आणि तरीही अतीव सहानुभूतीने रंगविलेले ' माणूस ' मधील नागर श्रमजीवी समाजाचे चित्रण आपल्याला हादरून टाकते. अस्वस्थ करून सोडते. आपल्या कलात्मक जाणिवांबरोबरच सामाजिक जाणिवांचे क्षितिज मोठ्या प्रमाणात विस्तारले जाते.

तल्हार कुठल्याही राजकीय तत्त्वज्ञानाची बांधिलकी स्वीकारून आपले लेखन करीत नाहीत. एक सच्चे कलावंत म्हणून ते आपल्या लेखन विषयाला सामोरे जातात. साहित्य म्हणजे समाजाचा आरसा ( Imitation of life ) असे ॲरिस्टॉटल समजतो. आर्नल्डप्रमाणेच प्रेमचंद हेही साहित्याला जीवनाची समीक्षा मानतात

यांपैकी कुठलीही व्याख्या स्वीकारली तरी सच्च्या कलावंताला जीवनाचे वास्तव विकृत करून चितारता येणार नाही. परंतु एवढ्यानेही जनवादी कलात्मकतेचा प्रश्न सुटत नाही. ग्रीक नाटककार, शेक्सपिअर किंवा कालिदास, भवभूती ह्यांच्या नाटकांमधून सामाजिक वास्तव नाकारले गेले आहे, असे नाही. परंतु चित्रणासाठी ते जे समाजांग निवडतात त्याचा संबंध समाजातील फक्त बलदंड शासकवर्गापुरताच सीमित राहतो. या वास्तवाकडे पाहण्याचा त्यांचा दृष्टिकोण सुद्धा नायकवर्गाच्या दृष्टिकोणापासून अभिन्न असतो. आधुनिक वैदर्भी जनवादी कादंबरीचे वैशिष्ट्य हे की या कादंबरीमधून श्रमजीवी, साधनवंचित, शोषित वर्गाचे चित्रण करण्यात येते. तेही अशा खुबीने की वरिष्ठ वर्गाचे सरळ चित्रण न करताही या चित्रांना एक समग्रता प्राप्त होते. आधुनिक संपूर्ण जीवनाची एक छोटी प्रतिकृती ( microcosm ) म्हणून ' माणूस ' आपल्यासमोर येते. प्रचारकी आवेशीपणा अथवा विद्रोहाचा बटबटीत आक्रोश न करताही ही कादंबरी वाचकांच्या मनात विद्रोहाचा व असंतोषाचा भडका उडविते. कलात्मकतेशी कुठेही तडजोड न करता वाचकांच्या सामाजिक जाणिवांवर आघात करते. प्रचलित समाजव्यवस्थेचे ओंगळ, हिडीस व रक्तपिपासू स्वरूप त्याच्यासमोर मांडून त्याला क्रांति-सन्मुख बनविते.

या कादंबरीतील प्रमुख पात्र शंकर हा रिक्षावाला असतो तो ज्या परिसरात वावरतो तो अशाच श्रमजीवी लोकांचा असतो. शंकरचा सगा मित्र रफिक हाही रिक्षावालाच. तो पाच रुपयांचा एक प्राईज बाँड विकत घेतो. योगायोग म्हणून त्याला साडेसात हजारांचे बक्षीस मिळते. रफिकचा आता रफिक ' शेट ' होतो. आपली मैत्री टिकून राहावी म्हणून शंकर व रफिक दोघेही प्रयत्नांची पराकाष्ठा करतात. परंतु बक्षीस-प्राप्तीच्या घटनेमधून जन्माला आलेले नवीन सामाजिक वास्तव एवढे बलिष्ठ असते की, त्यामुळे मैत्रीचे मूल्य कोसळून पडते. या नवीन वास्तवामधून निर्माण झालेली परात्मता ( Alienation ) रफिक आणि शंकर या दोघांनाही ग्रासून टाकते. त्यांच्यातील मानवीय पातळीवरील मैत्रीच्या संबंधात भली मोठी दरी तयार करते. रफिकचा आता हॉटेलमालक रफिकशेट झाला असल्यामुळे त्याच्यावर या परात्मतेचे शोकात्म परिणाम फारसे होत नाहीत. निर्धन शंकर मात्र उद्ध्वस्त होऊन जातो. त्याने प्रयत्नपूर्वक उभे केलेले मानवीय भावविश्व कोलमडून पडते. हा आघात आपला प्रभाव हळूहळू इतका वाढवीत नेतो की, अखेर एका बेभान तिरिमिरीत शंकरला अपघात होऊन त्याचे पाय कापून टाकले जातात. शंकरच्या पांगळेपणामुळे आजवर आडोशाचे, सुरक्षित जीवन जगणाऱ्या त्याच्या पत्नीला— शेवंतीला भांडीकुंडी घासण्याची कामे स्वीकारावीच लागतात. तिच्या असहायतेचा फायदा घेऊन एक ' सज्जन ' तिच्या शीलावर घाला घालण्याचा प्रयत्न करतो. अशा तऱ्हेने समाजदत्त परात्मता शंकरमधील ' माणूस ' पराभूत करते. परंतु हा 'माणूस'

पराभूत झालेला असला तरी नष्ट होत नाही. परात्मतेवर मात करण्यासाठी आयुष्य-भर धडपडलेला, पहेलवानी शरीरयष्टीचा शंकर आता पांगळा झालेला आहे. त्याचे शरीर बरगड्यांचा पिंजरा झालेले आहे. आणि तरीही पत्नीच्या विनयभंगाचे वृत्त ऐकताच तो ढुंगण घाशीत, अंधारात घराच्या बाहेर येतो. माणसामधील मानवीयता पराभूत झाली असली तरी तिची स्पंदने थांबलेली नाहीत. एक उज्ज्वल भविष्य निर्माण करण्याची शक्ती त्या स्पंदनामध्ये आहे असा दिलासा देऊन ही कादंबरी थांबते.

'माणूस'मधील संघर्ष हा अशा प्रकारचा आहे. या संघर्षाचे विश्लेषण करण्या-पूर्वी, किंबहुना ते करणे सोयीचे व्हावे म्हणून या कादंबरीच्या लेखनामागील तल्हारांच्या वैयक्तिक-सामाजिक प्रेरणांचे स्वरूप समजून घेणे आवश्यक आहे.

स्वराज्यप्राप्तीनंतरची पहिली काही वर्षे म्हणजे सामान्य माणसांना सुद्धा स्वातंत्र्याचा काहीसा आभासात्मक का होईना, साक्षात्कार देणारा कालखंड. परंतु या काळातील हे वास्तव काही अलगपणे आभाळातून टपकलेले नव्हते. एका प्रदीर्घ कालखंडामधील वैचारिक-भावनिक जाणिवांची, त्यांच्या पूर्तीसाठी लढल्या गेलेल्या लढ्यांची फलनिष्पत्ती म्हणून हे वास्तव जन्माला आले होते. भारतातील इंग्रजी साम्राज्याची प्रस्थापना व तिच्यामुळे भारतीयांच्या वाट्याला आलेल्या राजकीय गुलामगिरीचा प्रारंभ म्हणजेच भारतीय समाजातील कनिष्ठ गणल्या गेलेल्या वर्गाच्या सामाजिक गुलामगिरीच्या अंताचा प्रारंभ होय. कोणे एके काळी श्रमविभाजन सोयीचे जावे म्हणून मानवाने जन्माला घातलेली जातिप्रथा-नंतर एवढी बलिष्ठ होते की ती श्रमांऐवजी माणसांचेच विभाजन करून टाकते. माणसांवर जातींचे शिक्के मारून त्यांचे अमानवीकरण ( dehumanization ) करते.

इंग्रजी राज्याचे आगमन होते ते एक नवा युरोपीय उदारमतवादी विचार घेऊन. शिवाय युरोपमधील औद्योगिक क्रांतीची आरंभाची पदचिन्हे घेऊन. यंत्रनिष्ठ उत्पा-दनपद्धतीच्या आगमनाबरोबर जातिनिष्ठ उत्पादनपद्धती कालबाह्य होते. जाति-व्यवस्थेचा आर्थिक अवतार अशा रीतीने समाप्त होतो. उरते केवळ मानसिकता. मानवी स्वातंत्र्याचा एक टप्पा पूर्ण करणारी ही क्रांती जातिदत्त परात्मतेपासून माणूस आता मुक्त होतो. निदान पृष्ठपातळीवरील समाजव्यवहारातून तरी जातिदत्त हीन-तेची भावना नष्ट होते. अचेतन वा अर्धचेतन मानसिकतेमधून ती हद्दपार होत नाही, हे खरे; परंतु चेतन मानसिकतेच्या स्तरावरील तिची ऐतिहासिक भूमिका आता संपलेली असते.

युरोपीय उदारमतवादापासून स्फूर्ती घेऊन भारतात स्वातंत्र्यपूर्व काळातच एक प्रभावी समाज-प्रबोधन घडून आलेले असते. महात्मा फुले ह्यांनी लढविलेला जाति-विरोधी समतेचा लढा आणि नंतर डॉ. आंबेडकरांचा अस्पृश्यताविरोधी लढा ह्यांनी

भारतातल्या सामान्यातल्या सामान्य माणसास आत्मगौरवाचे एक नवे भान दिलेले असते. महात्मा गांधींचा स्वराज्यप्राप्तीचा लढासुद्धा, त्यात प्रत्येक स्तरावरील नागरिकाला समाविष्ट करून घेत असल्यामुळे, सामान्य माणसाला एक नवीन अस्मिता किंवा 'स्वत्व' ( Identity ) प्राप्त करून देतो. याच काळात रशियन राज्यक्रांतीच्या यशामधून निघालेले मार्क्सवादाचे वारे भारतात येऊन पोहोचतात. कामगारांचे मोठमोठे लढे लढविले जातात. त्यांना आपल्या हक्कपूर्ण स्थानाची नवीनच जाणीव प्राप्त झालेली असते. भरीला आर्थिक विषमतेविरुद्ध बोलत नसले तरी गाडगेबाबा, तुकडोजी महाराज यांसारखे संत माणसांमधील मूलभूत समतेच्या तत्त्वाचे प्रभावी प्रवर्तन करतात.

या सर्व घडामोडींचा अपरिहार्य परिपाक म्हणून भारतातील सामान्य माणूस आत्मगौरवाची एक नवी जाणीव घेऊन उभा असतो. आतापर्यंत शिक्षणापासून वंचित असलेल्या नवशिक्षितांचा एक मोठा वर्ग हळूहळू उदयास येतो. या नवशिक्षित वर्गाजवळ एक वेगळीच सामाजिक भूमिका असते. डॉ. पंजाबराव देशमुख किंवा कर्मवीर भाऊराव पाटील यांनी ज्या भूमिकेतून ज्ञानदानाची केन्द्रे उघडली त्या भूमिकेशी हा वर्ग परिचित असतो. श्रमिक, शोषित व दलित वर्गांचे मोटेपण त्याला पटलेले असते. या वर्गाकडे तो आता ममत्वाच्या, अभिमानाच्या व गौरवाच्या भावनेने पाहू लागतो. ही आत्मगौरवाची भावना त्याला पुन्हा एकदा त्याच्या मानवीयतेचा साक्षात्कार घडविते.

मनोहर तल्हार हे अशाच एका श्रमजीवी शिंपी जातीत जन्म घेतलेले लेखक होत. इंग्रजी अंमलातील नवप्राप्त स्वातंत्र्याची फलनिष्पत्ती म्हणून ते पदवी व सरकारी नोकरी प्राप्त करून शहरात स्थायिक झाले असले तरी त्यांना जन्म देणाऱ्या वर्गाशी असलेले त्यांचे भावनात्मक नाते ते विसरू शकले नाहीत. या वर्गाबद्दलचा त्यांचा अनुभव अस्सल होता. त्याचे कलात्मक चित्रण ते 'माणूस' मध्ये प्रामाणिकपणे करतात हे चित्रण इतके खरेखुरे व स्वयंस्पष्ट असते की त्याचा अर्थ सांगण्यासाठी त्यांना कोणतेच भाष्य करावे लागत नाही.

'माणूस' मध्ये तल्हार ज्या समाजविभागाचे चित्रण करतात तो नागर, असंघटित श्रमिक समाज असतो. तल्हार सांगत नसले तरी हा समाज ग्रामीण व्यवस्थेच्या विघटनाच्या प्रक्रियेमुळे खेड्यांमधून विस्थापित होऊन शहरांमध्ये प्रस्थापित होण्यासाठी आलेला असतो. खेड्यांमधून परागंदा झालेला हा वर्ग शहरात येतो तो विस्थापित, परागंदा ( migrated ) समाजाचे सगळे मानसिक व सामाजिक गुणविशेष घेऊन. नवीन ठिकाणी त्याची मुळे अजून खोलवर रुजलेली नसल्यामुळे त्याच्या मनावर एक प्रकारचे भय व असुरक्षितता यांसारख्या भावनांचे सावट असते. त्याचा सामना, करण्यासाठी तो अनेक मार्गांनी धडपडत असतो. मैत्री

शेजारधर्म, धार्मिक आचार यांसारख्या गोष्टींवर तो अतिरिक्त भर देत असतो. असुरक्षिततेच्या भावनेपासून स्वतःचा बचाव करण्यासाठी त्याने उभी केलेली ही बचावफळी असते.

'माणूस' चा नायक, रिक्षावाला शंकर हा या प्रवृत्तीचे प्रतिनिधित्व करणारा अस्सल प्रत्ययकारी माणूस आहे. बालपणीच अनाथ झालेला हा मुलगा हॉटेलमध्ये कपबश्या विसळण्यापासून आपल्या जीवनाची सुरुवात करतो. मग कुण्या सज्जनाच्या सहानुभूतीने रिक्षा चालविण्याच्या ( भाड्याने घेऊन ) अवस्थेपर्यंत येऊन पोहोचतो. तरीहार त्याची जात सांगत नाहीत. कारण, या अवस्थेत ती आता निरर्थक व संदर्भशून्य ( irrelevant ) झाली आहे.

शंकर दरिद्री असला तरी 'स्वतंत्र' आहे. जातिदत्त व्यवसायाच्या गुलामीपासून तो मुक्त झाला आहे. वेठबिगारीसारख्या जीवघेण्या प्रथांचा काच त्याला नाही. यंत्राने घडविलेल्या यंत्रसदृश रिक्षाकडे तो सुरुवातीला पाहतो तो त्याच्या मानवी स्वातंत्र्याचे प्रतीक म्हणून.

अर्थात, त्याचा भ्रमनिरास होण्यास फारसा अवधी लागतो, असे नाही. जातिदत्त परात्मता संपली असली तरी यंत्रदत्त परात्मतेचे पर्व लवकरच सुरू होते. त्याला ह्याचे जाणीवपूर्वक भान असते असे नाही. परंतु त्याचा काच मात्र तरी सुद्धा निश्चितपणे होतो. त्याच्या पहिल्या पत्नीचा प्रसूतिकालीन मृत्यू व नंतर पाच वर्षेपर्यंत दुसऱ्या पत्नीला मूल न होणे या घटनाही याच कालखंडातल्या. परंतु त्याच्या सर्जनशील मानवीयतेवर खरे प्रहार होतात ते व्यवसायदत्त अगतिकतेकडूनच. उपजीविकेचे साधन म्हणून तो ज्या रिक्षाचा स्वीकार करतो त्याच रिक्षाची तीन चाके त्याला आपल्यामागे अक्षरशः फरफटत, ओढत नेतात. रात्र आहे की दिवस आहे हे न पाहता, पाणीपाऊस यांची फिकीर न करता, तहानभूक मारण्यासाठी चहा, मिसळ व चारमिनार ह्यांचा मारा करीत त्याला राबावे लागते. काही काळ उपभोगलेल्या स्वातंत्र्यातील आभासात्मक सुखाचे शून्यपण त्याला आता जाणवू लागते. एक प्रचंड पोकळी डोक्यावर लटकत असल्याचा भास त्याला होऊ लागतो. ही भावना भीतिदायक असते. तिचे अस्तित्वसुद्धा मान्य करणे, त्याच्या जिवावर येते. तिला दडपून टाकण्यासाठी तो सतत मजाकीपणा, 'पोट्टेपणा' करीत राहतो. सतत गंमतबाजी करून हसत राहतो. पण हा एक नकली मुखवटा असतो, याची त्याला स्वतःलासुद्धा जाणीव असते. एका विकल क्षणी तो आपला मित्र रफिक ह्याला सांगतो,

'सब दुख और दर्द मैंने भुलानेकी कोशीस किया और चेहरेपे एक नकली चेहरा लगा लिया और ओ है मजाकिया आदमीका !' [ पृ. २०८ ]

परंतु परात्मतेच्या डंख वेदनांपासून मुक्ती मिळविण्यासाठी 'मजाकिया आदमीका' हा मुखवटा पुरेसा नसतो. त्यासाठी तो एक दुसरी प्रभावी संरक्षक तटबंदी उभी

करतो. या तटबंदीचे आधार असतात प्रेम व करुणा. बुद्ध व ख्रिस्त यांनी पुरस्कार केलेल्या, युगानुयुगांची मान्यता असलेल्या अचेतन स्तरापर्यंत माणसांच्या मनात हजारो वर्षे दृढमूल झालेल्या या मूल्यांच्या द्वारे तो आपले माणूसपण टिकवून ठेवू इच्छितो. वैभवी जीवन जगू शकत नाही म्हणून काय झाले ?

शंकरने स्वीकारलेली प्रेम व करुणेची मूल्ये कादंबरीत अनेक रूपांनी आविष्कृत होतात. मृत पत्नीची त्याला वारंवार येणारी आठवण, दुसऱ्या पाटाच्या पत्नीला (तिचेही हे दुसरे लग्न असते) सुरक्षित जीवन प्रदान करण्यासाठी चाललेली त्याची धडपड, लहान मुलांना रिक्षातून आणणे, हॉटेलमधील छोकऱ्याला रागाच्या भरात मारून पण मग विरघळून त्याला सिनेमा पाहण्यासाठी पैसे देणे, सोवळ्या ओवळ्याचे खूप अवडंबर माजविणाऱ्या काशी बुढीवर आजाराची आपत्ती ओढवताच तिच्या मदतीला सहकुटुंब धावून जाणे, तिची मनापासून सेवा करणे, झावरी कुत्री व तिची पिले ह्यांना मायेने जपणे, रफिकच्या म्हाताऱ्या आईवर आपल्याच आईसारखे प्रेम करणे, बयराम बुढ्याच्या मृत्यूनंतरचे क्रियाकर्म पुढे होऊन पार पाडणे यांसारख्या त्याच्या कृतींमधून व्यक्त होणाऱ्या निष्ठा म्हणजे याच मूल्यांचा व्यावहारिक पातळीवरील आविष्कार असतो. परंतु या तटबंदीमधील केंद्रीय आधाराच्या रूपाने उभा असतो तो मात्र त्याच्या व रफिकमधील मैत्रीचा संबंध. या संबंधाच्या जोरावर शंकर आपल्यामधील मानवीयता जोपासून ठेवू शकतो. निर्भयपणे इतर अनेक अडचणी व आपत्तींचा सामना करू शकतो. तिच्या आधारावर आपल्यातली आंतरिक पोकळी खूप कमी होते, असे त्याला जाणवत राहते.

रफिक हा कुठल्याशा खेड्यामधून निराधार होऊन आलेला तरुण त्याच्या भूतकालात आपल्याच भूतकालाचा इतिहास शंकरला दिसतो शंकर त्याला मदत करतो. ही मदत मिळाली नसती तर रफिकला माघारी जावे लागले असते. सहानुभव, अनुकंपा व समान परिस्थिती यांच्या जोरावर या दोघांमधली मैत्री घट्ट होते या मैत्रीमुळे आपली संरक्षक तटबंदी खूप भक्कम असल्याचे शंकरला वाटते. तिच्यामुळे त्याच्यातील मानवीयता मजबूतपणे उभी असते.

परंतु विषमताधिष्ठित समाजव्यवस्थेची शक्ती किती प्रचंड असते, ह्याचे प्रत्यंतर शंकरला लवकरच येते. ही व्यवस्था ऑक्टोपसप्रमाणे अष्टांगांनी माणसांभोवती आपले पाश आवळीत राहते. त्याचे लचके तोडीत राहते. शंकरला हळूहळू या शक्तीचा प्रत्यय येऊ लागतो. प्रथम, स्नेहाचे रेशमी बंध निर्माण करणारी काशी बुढी आपल्या नातवाबरोबर मोठ्या नाइलाजाने कोकणात निघून जाते. मग म्युनिसिपालिटीचे लोक झावरीला विष देऊन मारून टाकतात नंतर तिची सगळी पिले एक, एक करून नाहीशी होतात. म्हाताऱ्या बळीराम बुढ्याचा खोकल्याने बेजार होऊन मृत्यू घडून येतो. या सर्व प्रसंगांद्वारे शंकरच्या संरक्षक तटबंदीला एकएक खिंडार पडू लागते,

असे तल्हार मोठ्या कलात्मकतेने सूचित करतात.

परंतु त्याने उभ्या केलेल्या मूल्यात्मक तटबंदीवर खरा जोरदार प्रहार होतो तो एका वेगळ्याच मामुली भासणाऱ्या प्रसंगाने. रफिकला साडेसात हजारांची लॉटरी लागते. हा तो प्रसंग. वरवर पाहता, हा प्रसंग अगदी निरुपद्रवी वाटावा. आपल्या सग्या मित्राला लॉटरी लागून त्याचे भाग्य फळफळले म्हणून मैत्रीत दुरावा निर्माण होण्याची काय गरज? असा भाबडा प्रश्न अनेकजण विचारू शकतात. कृष्ण सुदामा मैत्रीचे उदाहरण आपल्या तोंडावर फेकून आपल्याला निरुत्तर करण्याचा प्रयत्न करू शकतात.

कादंबरीकार म्हणून तल्हारांची महत्ता ही की ते या प्रसंगातून साने गुरुजी छाप आदर्श मैत्रीची बाळबोध कथा तयार करीत नाहीत. कारण तशा कथा प्रत्यक्षात क्वचितच घडत असतात. "अर्थस्य पुरुषो दासः" असे महाभारतकार सांगतात. हा प्रत्यय येण्यासाठी जमीनदार-कारखानदारांचे अत्याचारच घडावे लागतात, असे नाही. इतक्या असंख्य पद्धतींनी 'अर्थ' आपला प्रभाव गाजवीत असतो की त्याचे संपूर्ण चित्रण महाकवीसुद्धा करू शकणार नाही. 'माणूस'मधील प्राईज बाँडचा छोटासा प्रसंग आपल्या पोटात ॲटम बॉम्बची विध्वंसक शक्ती बाळगून असतो. ह्याचा स्फोट एकदम होत नाही, हे खरे. परंतु, आतून पोखरून टाकणाऱ्या वाळवी-प्रमाणे तो हळूहळू आपले काम करतो.

रफिकला प्राईज बाँडचे साडेसात हजार रुपये प्राप्त होणे म्हणजे नियतीचा चमत्कार नव्हे. प्राईज बाँड, लॉटरी, लकी कूपन, जुगारी अड्डे यांसारखे 'खेळ' म्हणजे शोषक-शासक वर्गाने निर्माण केलेली शोषणाची प्रभावी हत्यारे होत. या अथवा अशाच अन्य 'खेळांचा' उगम वर्गीय समाजरचनेच्या उदयाबरोबरच होतो. वर्गविहीन समाजव्यवस्थेत त्यांचे काहीच प्रयोजन नसते. प्राईज बाँडसारख्या कल्पत्यांमुळे भांडवलदार शोषकवर्ग दोन प्रकारची उद्दिष्टे साध्य करून घेतो. पहिले साध्य हे लोकांच्या खिशांवर कात्री चालवून करोडो रुपये जमा केले जातात. मग त्यांपैकी एखाद टक्का रक्कम 'बक्षिसांच्या' रूपाने काही तथाकथित भाग्यवंतांना वाटली जाते. 'नशिबाचे' बुजगावणे उभे करून एक प्रकारच्या नजरबंदीच्या साहाय्याने लाखो लोकांचे धन लुबाडले जाते. बक्षिसांच्या लालचीने जवळचे असले नसले सर्व धन पणास लावून शेकडो 'तिकिटे' खरेदी करणारांची हजारो उदाहरणे पाहिली म्हणजे ही गोष्ट आपल्या चटकन लक्षात येते.

या खेळातून दुसरे व अधिक महत्त्वाचे जे उद्दिष्ट साध्य केले जाते ते असते जनमानसावर नशीब कल्पनेचा पगडा बसविण्याचे किंवा आणखी घट्ट करण्याचे. अल्प का होईना पण कुणाला तरी बक्षिसे मिळतात. पण त्यामुळे इतर असंख्य वंचितांचा तडफडाट आणखीच वाढतो. शिवाय धनिकांप्रमाणे नशीबवान लोक

अनुक्रमणिका

अत्यल्पच राहणार हाही विचार दृढ होतो. आपले बहुसंख्यांचे दैन्य या अल्प लबाडांमुळे जन्माला आलेले असते, हे त्यांच्या लक्षातच येत नाही.

या सर्व विवेचनावरून निष्कर्ष निघतो तो हा की, प्राईज बाँडच्या बक्षीसप्राप्तीचे उदाहरण नियतीच्या कर्तुमकर्तुम शक्तीचे नसून शोषकवर्गाच्या धूर्तपणाचे आहे. एका विशिष्ट आर्थिक व्यवस्थात्मक चौकटीपासून बळ घेऊन हा व्यवहार जन्माला येतो. त्यामुळे त्याचे स्वरूप 'नियती' असे न राहता आर्थिक नियततत्ववाद असे बनते.

या घटनेचे शंकर, रफिक आणि त्यांचा परिसर ह्यांच्यावर होणारे परिणाम सामाजिक व आर्थिक नियततत्ववादाने निबद्ध असे असतात. रफिकला वाटते आपल्या दोस्ताला आपण आपल्या नवीन हॉटेलच्या व्यवसायात भागीदार करून घ्यावे. परंतु सभोवतालची सामाजिक मूल्यव्यवस्था शंकरला हे 'दान' स्वीकारू देत नाही. त्याला वाटते या अनार्जित संपत्तीवर आपला हक्क नाही. या ठिकाणी शोषक-शासक वर्गाने निर्माण केलेल्या सामाजिक मूल्यव्यवस्थेचे दुटप्पी स्वरूप उघडे होते. रफिकची धनप्राप्ती काही त्याने 'अर्जित' केलेली नसते, परंतु नशिबाचा कौल या संज्ञेखाली त्याला ते धन उपभोगण्याची मुभा दिली जाते. परंतु मैत्रीचा आधार असूनही शंकरला मात्र तो हक्क नाकारला जातो. कारण अशाने तर मग सगळे गरीब माजून डोक्यावर बसू म्हणतील. शिवाय श्रमिक वर्गाला गुंगीचा डोस म्हणून 'स्वाभिमाना'चा पगडा त्यांच्यावर बसविला जातो. स्वामित्वाच्या संकल्पनेचे मूल्य इतके खोलवर रुजविले जाते की, रफिक आपण स्वामी आहोत हे विसरू शकत नाही, तर शंकरला मात्र आपण स्वामी नाही हे विसरता येत नाही. रफिक शंकरला परोपरीने 'मदत' करतो. स्वतःच्या गळ्यात मात्र सोन्याची साखळी घालून मिरवितो. शंकरला मोठ्या प्रेमाने ताजे रसगुल्ले खाऊ घालतो. गिऱ्हाइकांपासून येणारे पैसे मात्र स्वतःच्या गल्ल्यात जमा करतो.

अर्थात, प्रचलित मूल्यव्यवस्थेप्रमाणे हे सर्व स्वाभाविकच असते. एवढेच नव्हे तर रफिकसारख्या 'शेट'ने शंकरसारख्या मामुली रिक्षावाल्याला (दोस्त असला म्हणून काय झाले!) बरोबरीच्या नात्याने खाऊ घालावे हेही सभोवतीच्या समाजव्यवस्थेला सहन होत नाही. हे वास्तव तल्हार कादरच्या वागण्यातून मोठ्या खुबीने प्रदर्शित करतात.

प्राईज बाँडचे एक लहानसे चिटोरे अशा प्रकारे शंकर आणि रफिक यांच्यात अंतराय निर्माण करते. हे अंतर आडव्या रेषेतले नसते. ते उभे असते. रफिक व शंकर ह्यांच्या पातळ्या आता बदलतात. रफिक उच्चवर्गीय होतो तर शंकरचे कनिष्ठपण आणखी खाली गेलेले दिसते. आजपर्यंत दोघांची वर्गीय पातळी एक असल्यामुळे त्यांच्यातील मैत्रीचा आधार एकसंध, भक्कम व मजबूत असतो. आता या आधारामधील अर्धा भाग वर व दुसरा अर्धा भाग खाली सरकल्यामुळे तो

काडकन मोडून पडतो. त्याचे दोन तुकडे होतात. आणि त्यावर उभी असलेली शंकरची मानवीय मूल्यात्मक तटबंदी कोसळून पडते. त्याच्या जीवनाचा प्रवास आता उद्ध्वस्ततेच्या दिशेने वेगाने होऊ लागतो.

हे ध्वंसन वाचावे म्हणून त्याची पहिली प्रतिक्रिया होते ती कोणत्याही सर्वसामान्य माणसाची होईल तशीच त्याला वाटते. आपलेही नशीब रफिकसारखेच फळले तर! तसे होणार नाही अशी खात्री असतानाही एक वेडी आशा त्याला पोस्ट ऑफिसकडे खेचून नेते. अर्थात पदरात काही पडणार नसतेच. खिसा पाच रुपयांनी रिकामा होतो, इतकेच. मोडून पडलेल्या मैत्रीचे दुःख मात्र अधिकाधिक तीव्र होत जाते. आपल्या स्वत्वाचा एकमेव आधार-मैत्री-तोच पांगळा होऊन पडल्यामुळे तो पर्याय शोधू लागतो. इथे सुद्धा त्याचे वागणे सर्वसाधारण माणसासारखेच असते. काही नाही तर रिक्षा तरी निदान आपला स्वतःचा असावा, यासाठी मग तो खूप धडपड करतो. पैसे मिळतील म्हणून गणपतीच्या मिरवणुकीत वाघाचे सोंग घेऊन नाचायचे सुद्धा मान्य करतो.

वाघाचे सोंग घेऊन नाचण्याचा प्रसंग सुद्धा तसा साधाच; परंतु इथे सुद्धा तल्हार परात्मता आणि मानवीयता यांच्यातील संघर्ष मोठ्या मनोज्ञतेने चितारतात. असे सोंग घेऊन नाचणे कुणाला आवडेल? परंतु पैशांच्या लोभापायी पशूच्या पातळीवर उतरणे शंकर पत्करतो. निदान सोंग तरी उत्तम वठावे म्हणून नशापाणी करतो. वाघाच्या मुखवट्याबरोबरच पोट्टेपणाचा मुखवटा पुन्हा धारण करतो. 'आतील' मानवीय आवाज दडपून टाकण्यासाठी बाह्य पृष्ठपातळीवर थयथयाट करतो. अगदी एवढा की गणपती विसर्जन संपवून रात्री परत घरी जातो तेव्हा झोपेत असलेल्या पत्नीला केवळ गंमत म्हणून वाघासारखे आवाज काढून भिववितो. पाच वर्षांच्या प्रदीर्घ कालावधीनंतर प्रथमच शंकरचा अंकुर गर्भात वाढवीत असलेली शेवंती झीट येऊन खाली पडते. अपुऱ्या दिवसांच्या मृत मुलाला जन्म देते. शंकरची बेभान अवस्था आपल्याच निर्मितीचा बळी घेते. प्रत्यक्षात हा बळी असतो प्राईज बाँड नामक ॲटम बाँबचा. रफिकचा रफिकशेट झाला नसता, शंकरचे मूल्यविश्व विस्कटले गेले नसते तर तो पैशांसाठी नाचला असता काय?

ही घसरगुंडी इथेही थांबत नाही. मित्र रफिक त्याला सावरून घेण्याचा खूप प्रयत्न करतो. आपल्या मैत्रीचा दाखला पुनःपुन्हा त्याच्यासमोर ठेवतो. पण शब्दांच्या आतषबाजीने वास्तव बदलता येत नाही. एका वेगळ्या संदर्भात रफिक स्वतःच ते बोलून दाखवतो. आपल्या प्रेयसीचे दुसऱ्याशी लग्न लागल्यानंतर तो शंकरला सांगतो.

मैंने फरीदाके बारेमें सोचना बिल्कुल बंद कर दिया क्योंकि ओ मेरे बसकी बात नहीं थी। अब ओ बात भी हातसे जाती रही! तब शायद अब भी हम दोनों एक

दूसरेको चाहते थे। मगर ये दुनिया इस बात को कभी पसंद नहीं करती! गरीब-अमीर, ऊंचा-नीचा ये समाजके ऐसे बंधन हैं कि तोडकर तूट नहीं सकते!...(पृ. २९६)

जो अनुभव रफिकला येतो तोच शंकरला त्याहीपेक्षा भयानक संदर्भ घेऊन येतो. तल्हारांच्या वर्णनाप्रमाणे त्याची अवस्था पंख कापलेल्या पक्ष्यासारखी होते. तो विकल होऊन आपल्या मित्राला सांगतो :

"लेकिन मैं गरीब हूं। मैं गरीब हूं, रफिक, मैं भोत गरीब हूं." [पृ. ३०१] आणि मग लहान मुलासारखा रडू लागतो.

शंकरची घसरण आता जोरात सुरू होते. रफिककडे जावे तर लोक फुकटची मजा मारतो म्हणून नावे ठेवतात. रफिकचे नोकरसुद्धा त्याचा दुःस्वास करतात. त्याला पुनःपुन्हा पटवून देतात की तो एक निकम्मा भिकारी आहे. एक दिवस या अनुभवाचा जेव्हा कळस होतो तेव्हा एका तिरीमिरीत तो बेभान अवस्थेत वाट नेईल तिकडे फिरत सुटतो. त्यात अपघात होतो व दोन्ही पाय गुडघ्यांपासून कापून काढावे लागतात. या बिंदूवर शंकरचा पराभव पूर्ण होतो.

शंकरला होणारा अपघात हा सर्वसामान्य अपघात नसून तो प्राईज बाँडच्या घटनेशी शेवंतीच्या गर्भपाताच्या घटनेप्रमाणेच जैव (organic) संबंधाने जुडलेला आहे. शंकरच्या बेभान, असहाय, वैफल्यग्रस्त, निराश व पराभूत मनःस्थितीचा अपरिहार्य परिपाक म्हणून ही घटना घडते या घटनेचे दर्शनी मूल्य जेवढे आहे त्याहीपेक्षा तिचे प्रतीकात्मक मूल्य अधिक आहे. विषम समाजव्यवस्थेचे अमानुष स्वरूप ही घटना विदारकपणे दाखवून देते. ही व्यवस्था अशीच हजारो, लाखो बळी घेत राहते. माणसापासून त्याचे माणूसपण हिरावून घेते. जर एखादी व्यक्ती काही थोडेसे बंड करायचा प्रयत्न करील तर तिला पांगळे करून टाकते. आर्थिक-सामाजिक नियत-तत्ववादाची अपरिहार्य परिणती म्हणून ही घटना आपल्याला सामोरी येते. या व्यवस्थेच्या अनेक मायावी, क्रूर रूपांपैकी एक रूप आपल्यास इथे पाहावयास मिळते.

परंतु एक सच्चे जनवादी कलावंत असल्यामुळे तल्हार इथे थांबत नाहीत. वास्तविक, इथे या शोकात्मिकेचे रूपान्तर परिणामकारक शोकांतिकेत करता आले असते. परंतु तल्हारांचा शंकर प्रतिनायक ( Anti-Hero ) नाही. तो नायक आहे. तल्हार त्याच्यात नायकाचे सर्व गुण वसत असलेले पाहतात. तो पराभूत होतो, पण नष्ट होत नाही. त्याची लढाई सुरूच असते. त्याच्या पांगळ्या प्रयत्नातून फार तर एखादा तरंग उठू शकतो. परंतु अशाच अनेक तरंगांची मिळून एक मोठी धडक देणारी विकराळ लाट बनत असते. हा पोकळ आशावाद नसतो, विषम समाजव्यवस्थेची ताकद जेवढी खरी असते तेवढेच या लाटेचे भविष्यातले आगमन निश्चित असते. या आगमनाची सूचना देऊन मगच तल्हार आपली कादंबरी संपवितात. इथे एक थोर जनवादी कलाकृती निर्मिल्याचे श्रेय ते प्राप्त करतात.

'माणूस' ही मराठीतल्या सर्वश्रेष्ठ मोजक्या कादंबऱ्यांपैकी एक. (या श्रेणीतील सहजपणे समोर येणारी अन्य नावे : 'गोतावळा,' 'बळी' व 'रथचक्र'). या कादंबरीला हे स्थान प्राप्त करून देणाऱ्या आणखी एका महनीय गुणवैशिष्ट्याची चर्चा केल्याशिवाय हे विश्लेषण पूर्ण होऊ शकत नाही.

कुठलीही श्रेष्ठ कलाकृती वाचकांना अनेक पातळ्यांवर आवाहन करीत असते. 'माणूस'मधील कोणत्याही एकेका घटकाचा विचार केला तरी तो वाचकांना भारावून टाकील एवढा समर्थ आहे. रफिक-शंकरची फुलत जाणारी मैत्री, शंकरवर कोसळणारी संकट-परंपरा, सभोवतीची जिवंत समूहचित्रे, कनिष्ठ श्रमिक वर्गापासून तो उच्चमध्यमवर्गापर्यंतचे सहिष्णुतेने जगणारे समाजविश्व, या विश्वात निर्माण होणारे ताण तणाव, आणि या सर्वांमधून मुखरित होणारी अस्सल स्वभावचित्रे हे सर्वच घटक कोणत्याही पातळीवरील वाचकवर्गाला खिळवून टेवणारे आहेत.

परंतु 'माणूस'चे खरे यश हे आहे की ती वरच्या पातळीवरील सुजाण, चिकित्सक व विचारी वाचकांना सुद्धा झपाटून टाकते. त्यांच्या भावनांना आवाहन करीत असतानाच वरच्या पातळीवर ती त्यांना विचारसन्मुख बनवते. कादंबरीतील दर्शनी भागाचा भावनात्मक आस्वाद घेत असतानाच हे वाचक पृष्ठपातळीवरील घटिताला आकार देणाऱ्या, नियत करणाऱ्या व प्रेरक ठरणाऱ्या आर्थिक-सामाजिक शक्तींचेही वैचारिक विश्लेषण करीत जातात. हेही पुरेसे होत नाही म्हणून ते वरवर सहिष्णू, शांत व सौहार्दपूर्ण भासणाऱ्या या अनुभवविश्वाच्या तळाशी सतत चालू असलेल्या रौद्र-भीषण नाट्याचा वेध घेऊ लागतात. एका पातळीवर कादंबरीमधील पात्रांच्या सुखदुःखांबरोबर समरस होत असतानाच वाचक वेगळ्या पातळ्यांवर अलिप्त (detach) होऊन विचारी, विचक्षक व विश्लेषक दृष्टीने पार्श्वशक्तींचा अर्थ शोधू लागतात. तसेच तळभागापर्यंत जाऊन पोहोचणाऱ्या अदृश्य परिणामांचा वेध घेतात. 'माणूस'चा प्रभाव भावनिक व वैचारिक अशा दुहेरी प्रक्रियेमधून पडत असल्यामुळे तिला अधिक अर्थघनता प्राप्त होते. एकाच वेळी अनेक आयाम (dimensions) प्राप्त झाल्यामुळे तिच्यातील अनुभवांना एक आशयसंपन्न व्यामिश्रता लाभते.

या दुहेरी प्रक्रियेचा आणखी एक परिणाम होतो. त्याचे महत्त्व सुद्धा आगळेच असते. अमरावतीसारख्या लहान शहरातील (Town) एका समाजविभागात घडणाऱ्या घटनांचे तसे महत्त्व केवळ स्थळसापेक्ष असते. शंकर-रफिकचा अनुभव तसे म्हटले तर वैयक्तिक व स्थलनिबद्ध, परंतु पार्श्वभागीच्या सामाजिक-आर्थिक शक्तींचे स्वरूप मात्र वैश्विक पातळीवरचे असते. तसेच पृष्ठभागावरील घटितांच्या झिरपत जाणाऱ्या परिणामांचे सुद्धा तळाशी पोहोचताच सामान्यीकरण झालेले असते. त्यामुळे त्यांनाही आता वैश्विकतेचे परिमाण लाभलेले असते. कुठल्याही विषम

समाजव्यवस्थेत व कुठल्याही कालखंडात हेच अनुभव येणार. त्यामुळे 'माणूस'-मधील शंकरचा अनुभव वैश्विक पातळीवर जातो. फार थोड्या कादंबऱ्या हे यश साध्य करू शकतात. या थोड्यांपैकी 'माणूस' एक.

'माणूस'चे हे अलौकिक यश मान्य होण्यासारखी परिस्थिती आज नाही. पण म्हणून काय झाले? भविष्याचे आगमन अजून व्हावयाचे आहे. 'माणूस'चे कालातीत स्थान मात्र एव्हाना सिद्ध होऊन चुकले आहे.

---

## साभार स्वीकार

### नाटक

( १ ) कधी तरी...कोठे तरी : वसंत कानेटकर; पॉप्युलर प्रकाशन, मुंबई; १९८१; रु. १०

### चरित्रे, गौरव ग्रंथ

( १ ) थोर समाजसेविका सावित्रीबाई फुले : प्रेमा गोरे; श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८१; रु. ५

( २ ) महाराष्ट्राचे शिक्षण : प्रयोग आणि परंपरा : (शिक्षणमहर्षी बापूजी साळुंखे षष्ट्यब्दीपूर्ती गौरवग्रंथ) एस. एस. भोसले संपादित; शिक्षणमहर्षी बापूजी साळुंखे षष्ट्यब्दीपूर्ती समिती, कोल्हापूर; १९८०; रु. ४०

( ३ ) स्मृती जयांची चैतन्यफुले : संभाजीराव थोरात; ज्ञानेश्वर ज्ञानपीठ, कार्वे; १७८०; रु. १५

# मराठी कथेतील कलात्मकतेचा पुनर्विचार आणि तिचे भवितव्य

कमल देसाई

मी माझा निबंध तीन विभागांतून तुमच्यापुढे ठेवणार आहे—( १ ) कथेतील कलात्मकता म्हणजे काय ? कलात्मकता वेगळी अशी काही असते काय ? ( २ ) कथा या साहित्यप्रकाराची वैशिष्ट्ये–मराठी कथा-परंपरा आणि आजचे रूप. ( ३ ) कथेला भवितव्य आहे काय ?

( १ ) कलात्मकता ही संकल्पना अनेक पदरी आहे. तिचे हे अनेक पदर लक्षात घेऊन बहुनिकषवादी दृष्टी स्वीकारणे हे साहित्याला उपकारक असते. परंतु तसे घडत नाही. एखाद्या समीक्षकाला कथेचा स्वभावचित्रण हाच खरा निकष वाटतो आणि मग तो घटनावादी कथेला कथा म्हणावयाला तयार होत नाही. परंतु स्वभावचित्रण जसा निकष आहे तसा घटनाप्रधानता हाही कथेचा निकष असतो. मात्र दर दशकात एखाद्याच पदरावर विशेष भर दिला जातो आणि इतर पदरांकडे दुर्लक्ष होते. प्रथम तो पैलू किंवा तो पदर नवीन असतो, प्रयोगशील असतो, लवचिक असतो. तो पैलू त्याच्या सर्व वैशिष्ट्यांनी राबवला जातो आणि कालांतराने त्याचाही एक साचा बनतो. साहजिकच साहित्यप्रकाराला त्यामुळे बंदिस्तपणा येतो आणि तो साचा मोडून नवे प्रयोग करण्याची गरज भासू लागते. स्वातंत्र्यपूर्व काळात साहित्य हे एका समाजप्रबोधनाचे प्रभावी साधन मानले जात असे आणि त्याकरता ते समर्थपणे राबवले जात असे. स्वातंत्र्यकाळात साहित्याला हा समाजप्रबोधनाचा जाच उरला नाही. आणि साहित्य एक कला या नात्याने स्वयंभू आहे, साहित्य साधन नसून साध्य आहे, स्वतंत्र आहे अशी कलावादी भूमिका पुढे आली. काही काळ या कलावादी भूमिकेचा उत्कर्ष झाला. परंतु आज या कलावादी भूमिकेने कथेचाही एक साचा बनला आहे. नवी पिढी नवा मार्ग चोखाळण्याचा प्रयत्न करते आहे. समीक्षकापुढे प्रत्येक दशकात 'कशाला कलात्मक म्हणावयाचे' हा प्रश्न पुनःपुन्हा येत राहतो आणि सामाजिक संदर्भातच, सामाजिक गरजेनुसारच ह्याही प्रश्नाचे उत्तर

अनुक्रमणिका

शोधावे लागते.

आज जो कलात्मकतेचा प्रश्न निकडीने मराठी साहित्यात आला आहे याचे कारण म्हणजे मर्ढेकरांनी दिलेल्या कलामूल्यांनी साहित्य कुठेतरी बंदिस्त झाल्यासारखे वाटते आहे. तो कलामूल्याचा विचार अपूर्ण वाटतो आहे. नव्हे अपूर्ण आहे. आणि तरी त्या कलामूल्यांचा अनिवार्य पगडा जाणकारांच्यावर आहे. आणि दुसरे म्हणजे आज एक संक्रमणाचा, सामाजिक अभिसरणाचा काळ आहे. निरनिराळ्या सामाजिक स्तरांतून आविष्काराची धडपड आपल्याला दिसते. हे आविष्कार काही एकाच एका प्रमाणाला धरून होत नाहीत, त्यामुळे असलेल्या वाङ्मयीन चौकटीत ते सामावू शकत नाहीत. आजचे जे दलित साहित्य आहे ते केवळ दलित म्हणून, विद्रोही आहे म्हणून कलात्मक म्हणावयाचे का ? खरे तर दलितांना प्रथमच आविष्कार सापडतो आहे, अजून त्यांची भाषा घडावयाची आहे; अशा वेळी समीक्षकांना या आविष्काराबाबत स्वागतशील राहणे क्रमप्राप्त आहे. निरनिराळ्या स्तरांतून जे आविष्कार आज आपल्यासमोर येत आहेत त्याबाबत उदार दृष्टिकोण स्वीकारून त्यातले बरे वाईट ठरवणे आवश्यक असते. प्रस्थापित प्रमाणभूत संकेताबाहेरही कलात्मकता असण्याची शक्यता नाकारून चालणार नाही. ती कशा प्रकारची दिसते हे समीक्षकांना आता ठरवावे लागेल. या दोन्ही दृष्टींनी कलात्मकतेचा पुनर्विचार करणे आवश्यक आहे.

मर्ढेकरांनी कलामूल्ये आणि जीवनमूल्ये अलग केली. साहित्य सुंदर कशाने ठरते ? तर त्यात नीती आहे, सामाजिक समस्या आहे, तत्कालीन प्रश्न आहेत म्हणून नव्हे तर त्यात कलेचे म्हणून जे लयतत्त्व आहे, ते संवाद-विरोधाचे नियम त्यात पाळलेले आहेत, त्यामुळे त्यात एक रचना आहे, त्यात एक घाट आहे म्हणून ते सुंदर आहे. मग त्याचा जीवनाशी संबंध असावयाला हवाच असे नाही. कला हे स्वयंभू मूल्य. कलेचे क्षेत्र स्वयंभू. मर्ढेकरांच्या स्वयंभू कलामूल्यांचा पगडा गेली वीस वर्षे तरी मराठी साहित्यावर तीव्रपणे चालू आहे. या समीक्षेत एक ओढाताण आहे. साहित्य जीवनापासून अलग कसे करावयाचे आणि दुसरा लयतत्त्वाचे नियम साहित्यात शोधावयाचे म्हणजे नेमके काय करावयाचे ? साहित्य आणि इतर कला यांत फरक आहे. भाषा हे जीवनव्यवहाराचे माध्यमच साहित्याचे माध्यम आहे. भाषेला सामाजिक सांस्कृतिक अंग आहे. सामाजिक-सांस्कृतिक अंगापासून तिला दूर करून केवळ कलात्मक अंगाने भाषेची रचना कशी करता येईल ? आणि भाषेला निव्वळ कलात्मक अंग असे काही असते काय ? मर्ढेकरांच्या समीक्षेने काही नव्या संकल्पना दिल्या—प्रतिमा, घाट, आकृतिबंध, संवाद-विरोध समतोल. अशा संकल्पना वापरून माधव आचवल यांनी समीक्षा करण्याचा प्रयत्न केला. मर्ढेकरांनी गाडगिळांच्या कथेचे विश्लेषण संवाद-विरोध या संकल्पनांतून देण्याचा प्रयत्न केला.

परंतु त्यांच्या समीक्षेने खरोखरच गाडगिळांच्या कथा सुंदर कशा झाल्या हे समजते काय ? किंवा त्यांना तरी ही तत्त्वे वापरून पूर्णतया कथांचे समीक्षण करता आले काय ? त्या तत्त्वात त्या कथा सामावल्या की काही शिल्लक राहिले ? आचवलांना कथेचा अर्थ काय हे विचारात घ्यावेच लागले. आणि जी.एं.च्या कथांचा किंवा खानोलकरांच्या कथांचा परामर्श घेताना आचवलांना ती तत्त्वे वापरावयाची म्हणजे फार कसरत करावी लागली. फार ओढाताण तरी करावी लागली किंवा संपूर्णतया ती दृष्टी टाकून जीवनवादी दृष्टीच स्वीकारावी लागली आहे. खुद्द मर्ढेकरांचे काव्य आणि त्यांची समीक्षा व सौंदर्यशास्त्र यात विरोधाभास आहे. त्यांचे काव्य सरळ जीवनाचे भाष्य आहे. ते त्यांच्या केवळ कलामूल्यात बसूच शकत नाही. मर्ढेकरांनी कलामूल्यांचा विचार केला तेव्हा साहित्याच्या संदर्भात त्यांनाही अर्थवादी आणि जीवनवादी मूल्यातून निर्माण होणाऱ्या प्रश्नांना टाळता आलेले नाही. वाङ्मयीन महात्मता, आत्मनिष्ठा हे विचार आणि लयतत्त्व यांची सांगड त्यांना घालता आलेली नाही. जेव्हा हे प्रश्न टाळले तेव्हा त्यांची समीक्षा अधुरीच राहिली.

कलात्मकता जीवनाशी विरोधी असते असे नाही. बहुनिकषवाद स्वीकारला म्हणजे हा प्रसंगच येत नाही. परंतु कलावाद्यांच्या मते विचाराने कलात्मकतेवर कुरघोडी करता कामा नये. कथेचे ‘कथापण’ तिच्यातील वाङ्मयीन गुणवत्तेत असते. आणि वाङ्मयीन गुणवत्तेचा बाहेरच्या जीवनाशी संबंध असलाच पाहिजे असे नाही. किंबहुना कलेचे स्वयंभूपण तिच्या या वाङ्मयीन गुणवत्तेवरच असते, पण कलावादी वाङ्मयीन मूल्ये म्हणून जी देतात तीच मुळी जीवनमूल्ये असतात. जी. ए. कुलकर्णी मनुष्याच्या पराभूततेचे, आत्मसन्मान गमावल्याचे विविध आकार आपल्या कथांतून शोधतात असं म्हणताना आत्मसन्मान गमावणे हे जीवनमूल्य असते हे भानच राहात नाही कलावाद्यांना. शिवाय त्यांच्या कथेतील एखादा गारुडी जेव्हा पराभूत होतो, आत्मसन्मान गमावतो तेव्हा तो त्या जमातीच्या मूल्यांच्या संदर्भातच गमावतो, जागतिक किंवा शाश्वत दृष्टीने नव्हे. त्याची जमात त्याला नाकारते. आणि जमातीने नाकारणे, समाजाने नाकारणे हे समाजाच्या संदर्भातच शक्य होते. प्रत्यक्ष जीवनात माणसे हरघडी आत्मसन्मान गमावत असतात. आपण काही गमावले आहे हेही त्यांना कळत नसते ही शोकांतिका. एखादा जी.ए. ते कथेत सांगू शकतो. कलावाद्यांचे म्हणणे असे की, “आम्ही म्हणतच नाही, साहित्यात सामाजिकता नसते म्हणून. साहित्याला सामाजिकता अटळ आहे. परंतु वाङ्मयीन मूल्याशी साहित्यिकाने अधिक एकनिष्ठ असावयाला हवे. केवळ श्रेष्ठ विचार आहे म्हणून तो त्या कथेत वसत नसताही विचारासाठी घुसडावयाचा आणि कलात्मकतेला बाध आणावयाची हे चूक.” पण मग ही वाङ्मयीन मूल्ये नेमकी कुठली, कोणती ? निव्वळ वाङ्मयीन मूल्ये ही रिक्त असतात, आणि कलात्मकतेला वैचारिकता न पेलवण्याइतकी जर ती

दुबळी झाली असेल, होत असेल, तर असली रिक्त कलात्मकता नष्ट होणेच साहित्याला इष्ट. अंती ते साहित्याला हितावह होणार आहे.

साहित्यिकाला आजची परिस्थितीही तसे एक आव्हान आहे. आज असे कुठलेच क्षेत्र नाही, की ज्या क्षेत्रात तुडुंब भ्रष्टता नाही. कुठल्याच व्यक्तीला शुद्ध स्वच्छ आणि या चिखलापासून दूर होता येत नाही. अशा वेळी साहित्यिक ही परिस्थिती नोंदवणार की नाही? साहित्यिक या नात्याने तुमचे काही एक कार्य आहे की नाही? साहित्यिक या नात्याने काही एक ठाम नैतिक भूमिका स्वीकारणार आहात की नाही? इथे नैतिकता याचा अर्थ व्यापक घ्यावयाचा. आपल्या भोवतालच्या अपरंपार दुःखाला जणू आपणच जबाबदार आहोत अशा एका निकडीने, गंभीरपणे ती जबाबदारी स्वीकारायची असते. आणि भाषेच्या माध्यमातून ती नोंदवायची असते. हा गंभीरपणा, ही प्रौढ प्रगल्भता म्हणजेच नीती होय. आपल्या आरंभीच्या कथांतून जी.एं.नी ही दुःखाची जबाबदारी स्वीकारली आणि समर्थपणे कठोरपणे पेलून धरली. हे आव्हान स्वीकारणे म्हणजे व्रती होणे. त्यात धोका आहे. त्यापेक्षा काही प्रश्नच नाहीत म्हणून स्वयंभू कलेला शरण जाते. या दोन प्रवाहांचा आज संघर्ष आहे. आणि कलात्मकता म्हणजे काय हा प्रश्न पुनः विचारार्थ आला आहे. ही कलात्मतेच्या पुनर्विचाराची आजची पार्श्वभूमी आहे.

या पार्श्वभूमीवर कलात्मकता म्हणजे काय हे सांगता येईल काय? प्राचीन काळापासून कलाकृतीचे शरीर व आत्मा असे दोन भाग करण्यात येतात—आशय आणि शैली. शैलीच्या अंगाने रीति–ध्वनि–अलंकार इत्यादी तत्त्वे रचनेची तत्त्वे म्हणून पुढे आली. पण कुठल्याच एका तत्त्वाने समाधान होत नाही. उलट हा शोध पुनः पुन्हा होतच राहिला. काय सांगावयाचे आणि कसे सांगावयाचे असे फडके यांनी दोन भाग केले, आणि कसे सांगावयाचे ह्याला महत्त्व दिले. 'कसे सांगण्यात' तंत्राला प्राधान्य आले. रंजनाला महत्त्व देऊन वाचकाला गुंतवण्याकरता उत्कंठा-विसर्जन या कार्यद्यान्वये गुंतागुंत–निरगाठ–उकल अशी तत्त्वे पुढे आली. चमत्कृति-पूर्णता, धक्का देणे–वाचकाला सुखद आश्चर्यात ओढणे, संघर्ष ही ब्रिटिश काळातील तत्त्वे समीक्षकांत विशेष लोकप्रिय होती नंतरच्या काळात काय सांगणे आणि कसे सांगणे यांचा एकजीव असतो का याचा विचार प्रामुख्याने आला. आणि रचनाबंध, सेंद्रियसंघात, अनिवार्य घाट-पोत ह्या संकल्पना आल्या. एखादी साहित्यकृती ती रचनाच, तो घाटच अनिवार्यपणे घेऊन जन्माला येते. तिचे अंतर्गत घटकांचे संबंध एखाद्या सजीव प्राण्यासारखे आवश्यक आणि हे घटक कथेच्या नियमांनी बांधलेले, तार्किक संगतीने नव्हे. जर रचना आणि आशय एकजीव असतील तर कादंबरीचे नाटक होता कामा नये. पण कादंबरीचे नाटक करता येते, त्यावर चित्रपट निघतो. म्हणजे तशी अनिवार्यता नसावी. काही एका मर्यादेपर्यंत रचना अलग करता येते.

अनुक्रमणिका

आशय वेगळा म्हणून सांगता येतो. कलात्मक तत्त्वांची ही पार्श्वभूमी आहे.

आज निरनिराळ्या सामाजिक स्तरांतून लेखन करणारी नवी पिढी-तिला हे सर्व संकेत माहीत असतातच असे नाही. मग सांगावयाचे आहे, पण प्रस्थापित अशा संकेतात ते लेखन बसत नाही. संकेतांपेक्षा समाजाची भाषा अधिक बोलकी, सतत वाहती, जिवंत असते. तेव्हा मला सांगावयाचे आहे, या माझ्या भाषेतून सांगावयाचे आहे आणि ते तुम्ही ऐकावयाला हवेत अशा एका बंडखोरीतून काही एक साहित्य पुढे येत आहे. आता तेवढ्यामुळेच हे साहित्य सुंदर ठरते का? त्याला कलात्मक म्हणायचे का?

कलात्मकतेचा काही एक व्यापक आलेख मांडता येतो का ते पाहू—

( १ ) मला आवडते—काही साहित्य आपलं आवडून जातं. आपली एक व्यक्तिगत प्रतिक्रिया असते. त्यात वस्तुनिष्ठता किंवा सार्वत्रिकता नसते. पण रंजकता असते. तात्पुरत्या करमणूक करणाऱ्या. त्या गुंतवतात. या साहित्यात वाचकाच्या stock responses ना राबवलेले असते. पण नंतर त्यांचा कंटाळा येतो. आणि कंटाळा येणे हीच त्याची मर्यादा असते. पण अशा कथांनाही त्यांचे असे एक स्थान असते. द. मा. मिरासदार, शंकर पाटील यांच्या काही कथा यात बसतील. धिंड ही कथा पाहावी. ती एकदा आवडते, दुसऱ्यांदा चालेल...पण तिसऱ्यांदा-टाळावी ...चौथ्यांदा नको बुवा.—पुरे असे वाटते.

( २ ) सुंदर आहे—या कथा कलात्मक, रचनेत आकर्षक असतात. त्या वाचकांच्या संवेदनांना सुखवतात. त्यांचा विषय प्रीती असतो. माधुर्य, गोडवा असली विशेषणे त्यांना चपखल बसतात. पुनःपुन्हा आपण त्या कथा वाचतो आणि आपल्याला आनंद मिळतो. तलावातले चांदणे, कोणे एके काळी, परिणीता, मन प्रसन्न होतं. अशा कथा शब्दाच्या साक्षेपी असतात, आणि बांधेसूद बांधणी करतात. परंतु या कथा वाचकाला विचार करायला लावत नाहीत. प्रक्षुब्ध करत नाहीत. त्यांना सामाजिक संदर्भ असलाच पाहिजे असे नाही. ह्याही कथांना त्यांचे म्हणून स्थान असते.

( ३ ) चांगली आहे—यात एक सामाजिक जाणीव, सामाजिक भान असते. सामाजिक भान देणारी कथा–भाषेच्या माध्यमातून. ते द्यावयाचे असते म्हणून रचना.–विशिष्ट प्रकाराने बांधलेली दीपावलीच्या दिवाळी अंकातील अनिल बर्वे यांची कथा या दृष्टीने बघण्यासारखी आहे. सामाजिकता कथेत असावी किंवा असते याचा अर्थ काय? तर लेखक ज्या परिसरात वावरतो त्या परिसराचे अंगोपांगाने भान असणे. मग ते परिसर अगदी छोटे, एखाद्या लहानशा जमातीचे मर्यादित असले तरी बिघडत नाही. ( किडलेली माणसे हे मुंबईच्या मध्यमवर्गीय चाळीचे दर्शन ) आपल्या सभोवतालचा भाग, त्यातले आचार-विचार, त्यातली भाषा, त्या

परिसरामुळेच आचारविचारामुळेच पडणारी बंधने—मर्यादा, त्यांचा जाच, त्यातून निर्माण होणारे संघर्ष, व्यक्ती आणि परिसर यांतील ताणतणाव यांचे भान कथेत येणे महत्त्वाचे—व्यंकटेश माडगूळकरांच्या कथा, यामुळे आपण आपल्या परिसराशी, काळाशी प्रामाणिक राहून प्रतिसाद देतो. अर्थातच आज जग जवळ येते आहे. त्यामुळे बाहेरच्या जगातील विचार आणि आपल्या परिसरातील सामाजिक बंदिस्तपणा यांचाही संघर्ष अटळ आहे. पण तो आपल्या परिसराच्या, समाजाच्या संदर्भातच असतो. केवळ तो परकीय विचार आपल्या परिसराचा विचार न करता मांडणे उचित नव्हे. मग तो उपरा परकाच राहतो. केवळ त्या देश्य—काळावर केंद्रित केल्याने उद्या ते साहित्य कालबाह्य ठरेल अशी भीती बाळगण्याचे कारण नाही. कारण काळाशी प्रामाणिक असलेल्या कथेला ऐतिहासिक मूल्य नक्कीच असते. आणि तेही काही कमी नव्हे. किंबहुना लेखकच काळाचा प्रामाणिक आलेख काढत असतो.

लेखक हा तत्कालीन देश्यकालातून घडलेला असतो. त्याचे मुक्त मन आणि संवेदनाशीलता, चिंतनशीलता यातून तो सभोवतालच्या परिस्थितीला प्रतिसाद देतो. म्हणजे परंपरेतून घडवलेले—मुसावलेले व्यक्तित्व आणि मुक्त मनाने स्वीकारलेली नैतिक भूमिका असे दुपेडी लेखकाचे व्यक्तित्व असते. या त्याच्या नैतिक भूमिकेतून तो साहित्यात नवे प्रयोग करतो. परंतु प्रयोगाखातर प्रयोग टिकत नाहीत. त्या प्रयोगाला काही तरी प्रयोगशीलता असावी लागते.

(४) श्रेष्ठ आहे—इथे निश्चित नैतिक भूमिका घेऊन समग्र सामाजिकतेला स्पर्श केला जातो आणि विचाराचे एक नवे पाऊल टाकले जाते. असलेली सामाजिक कोंडी फोडून नवा विचार देणे हेच सौंदर्य असते. विचार सुंदर असतात. डोस्टोव्हस्कीने एकदा एक प्रश्न विचारला होता—या लहान, दिवसांतल्या मुलाला बळी देऊनही जर तळ्याला पाणी लागले नाही तर त्या निष्पाप जिवाच्या हत्येची जबाबदारी कोण घेणार? त्याचे पाप कोणाला? त्या पापाची जबाबदारी कोणाची? इथे एकदम पारंपरिक साचलेल्या समाजाची कोंडी ह्या नव्या विचाराने फोडली जाते. आगरकरांनी एकदा असाच प्रश्न केला—त्यातून नवा विचार मांडला—ज्या समाजात कुणाला तरी सुखाने जगण्यासाठी कुणाला तरी त्याग करावा लागतो तो समाजच किडलेला. समाजालाच कीड लागते—आणि त्याग करावा लागणे हे काही निरोगीपणाचे लक्षण नव्हे हे त्या काळात सांगणे म्हणजे विचाराने नवी वाट करून देणे. असे साहित्य नेहमी श्रेष्ठ असते.

## २

कथा हा वाङ्मयप्रकार फार सनातन आहे. 'सूत शौनकाला सांगतो'—या सूतांना कथा सांगण्याचे काम असे. ती नैतिक जबाबदारी योग्य प्रकारे समाजात पार पाडावी

अनुक्रमणिका

लागत असे. यात भाषेचे मंत्र-सामर्थ्य लक्षात घेतलेले असे. आणि कथाकाराल सांगण्याने व श्रोत्याला ऐकण्याने पुण्य लाभत असे. फल मिळत असे. कहाण्यांच्या बाबतीतही ही प्रथा सांभाळलेली दिसते. आणि कूटप्रश्न, यक्षप्रश्न, प्रहेलिका यासारख्या प्रकारात तर मंत्रसामर्थ्य हेच महत्त्वाचे असे.

कथा सांगण्यात–ऐकण्यात श्रोत्याचा भाग असे आणि श्रोता अविभाज्य घटक असे. तो संबंध रचनेत भाग घेत असे, आणि कथाकार-श्रोता यांच्या संयोगातून कथा फुलत असे. मुद्रणकला नव्हती तेव्हा कथेत जो एक कथाकार-श्रोता यांचा जिवंत भाग असे तो मुद्रणकला आल्यानंतर गेला.

ब्रिटिश काळात मुद्रणकला आली तरी पूर्वीच्या कथाप्रवचन, पुराण व कीर्तन यांतून टिकून राहिल्या. मात्र मराठी साहित्याला सुरुवात झाली ब्रिटिश अमदानीत ती कथेने नव्हे. कादंबरी काव्याने. कादंबरीच्या आश्रयाने प्रथम कथा आल्या. याचे कारण तशी त्या काळात फारशी मासिके नव्हती. परंतु पुस्तके छापली जात. स्वाभाविकच कादंबऱ्या छापल्या गेल्या–लिहिल्या गेल्या. हरिभाऊंनी ज्या कथा लिहिल्या त्या लघुकादंबऱ्यांसारख्या आहेत. त्यात पाल्हाळ, पुनरावृत्ती, रचनेची ढिलाई, इत्यादी गोष्टी जाणवतात. फडके यांनी कथेला कादंबरीच्या जाचातून सोडवले. तिला सुबक असे रूप दिले. परंतु फडके-खांडेकर कादंबरीकार म्हणूनच प्रामुख्याने गाजले. पारतंत्र्याच्या काळात फडके यांनी 'सांगणे'ला महत्त्व दिले. तरी खांडेकर–माडखोलकर–पु. य. देशपांडे ही सर्व मंडळी प्रामुख्याने जीवनवादी, ध्येयवादीच राहिली. काय आहे त्यापेक्षा कसे असावे याकडे यांचा ओढा दिसतो. बोधवाद आणि आदर्शवाद याचे एक विचित्र मिश्रण यांच्या कथांतून दिसते. शिवाय शिक्षित पिढीच लिहायची, बहुधा ही मंडळी शिक्षक, संपादक असत. इंग्रजी साहित्याचा त्यांच्या साहित्यावर परिणाम होत असे. हे कथेचे युग ब्राह्मणी युग होते. त्यात त्यांची दुःखे आली. त्यांचे प्रश्न आले. त्यामुळे तसे ते साहित्य एकांगी राहिले.

स्वातंत्र्याच्या काळात जुन्या ध्येयवादाविषयी, मूल्यांविषयी आस्था उरली नाही. निरनिराळ्या क्षेत्रांतून लेखक आले. नव्या वास्तवाचा स्वातंत्र्याचा नीट अर्थ लागला नाही की आकलन झाले नाही. यातून पुढे काय होईल याचे चित्र–त्याचे भान आले नाही. मर्ढेकरांचे सौंदर्यशास्त्र व समीक्षा यांनी जबरदस्त पगडा बसवला. अनेक मासिके निघाली आणि मासिके भरण्यासाठी कथांची आवश्यकता वाटू लागली. दिवाळी अंकांची त्यात भर पडली. या दिवाळी अंकांनी कथेला मार्ग मोकळा करून दिला.

मात्र कथेला कादंबरीच्या जाचातून सोडवून तिचे तिला स्वतंत्र रूप, स्वतंत्र अस्तित्व मिळवून दिले गाडगीळ–माडगूळकर–गोखले यांनीच. त्यानंतरच कथेला कथा म्हणून प्रतिष्ठा मिळाली. कथा हा साहित्यप्रकार आहे आणि तो साहित्यप्रकार उत्तम

दर्जाचे साहित्य देऊ शकतो हे दाखवून दिले. या नव्या लेखकांनी भाषेचे भान ठेवून कथेत निरनिराळे प्रयोग केले. तिला चैतन्य दिले. ह्यानंतर नवी कथा बहरली. उत्कर्षाला पोचली.

आता कथा छापली जाते यात लेखक–वाचक यांचा संबंध येत नाही. तो रचनेचा भाग संपूर्णतया गळून पडतो. आपण लेखन डोळ्याने वाचतो. त्यामुळे कानाने ऐकताना येणारे ध्वनीचे महत्त्व गळून पडते. आता कथेत संघर्ष नसला तरी चालतो खूप तपशीलच दिला व त्यातून सुचवले तरी कथा होऊ शकते. डोळ्यांनी पाहण्यातून कथेत सिनेमाचे तत्र आले Flash back इत्यादी. 'एक होता राजा' असे काही तिला लागेनासे झाले. भाषेचे भान आणि मुद्रण यातून कथेने नवे वळण घेतले आणि आपले स्वतंत्र क्षेत्र भरभराटीला आणले.

आज कथेच्या क्षेत्रात अस्थिरता जाणवते. भांबावलेपण सर्वत्र आले आहे. कलावादी भूमिका जुनी आणि अपुरी झाली आहे. परंतु म्हणावी तशी नवी पिढी तयार होताना दिसत नाही. उलट नवे लेखक एक तर आवर्तात तरी सापडलेत किंवा नव्या मार्गाने चाचपडत तरी आहेत. मात्र आजच्या लेखकाला कलावादाची कोंडी फोडावयाची आहे. आज उदंड मासिके निघतात. कोणीही कथा लिहितो. कुठेच गांभीर्य नसते. त्याची धड वाङ्मयीन संकेताशी परंपरेशी ओळख नसते, धड त्याला वास्तवाचे भान नसते. त्यामुळे उदंड कथा असूनही त्यांना कसला दर्जा, कसली पातळी नाही.

३

आज जीवनातले प्रश्न अधिकाधिक गुंतागुंतीचे व्यामिश्र झाल्याने कथा तिच्या लघुपणामुळे, लहानशा आकारामुळे या प्रश्नांच्या संदर्भात तोकडी पडते. कथा हे प्रश्नच हाताळू शकत नाही. या दृष्टीने कथेची आज गरजच उरली नाही. ती संपल्यासारखी झाली आहे. जर सांस्कृतिक दृष्ट्या खरोखरच कथेची गरज संपलेली असेल तर तो वाङ्मयप्रकार आपोआपच नाहीसा होईल. आपण काहीच करण्याची गरज उरणार नाही. कारण तो स्वभावच असणार. पण कथा हा सनातन वाङ्मय-प्रकार मानसिक गरजेतून निर्माण झाला आहे. त्या प्रकाराला म्हणून काही शक्यता आहेत, बलस्थाने आहेत. ती बलस्थाने त्या शक्यता आजच्या गरजेच्या दृष्टीने हेरून राबवणारा कल्पक आणि समर्थ कथाकार आज हवा आहे. खरी गोष्ट एवढीच आहे आणि समीक्षकांनी वाङ्मयप्रकाराच्या संकेताची झापडे टाकून वाङ्मयप्रकार लवचिक असतो हे लक्षात ठेवून कथा शोधली पाहिजे. परवा अशोक शहाणे यांनी 'आमचा भारत' या मालेतून बंगाली लेखकांनी घेतलेल्या फुटपाथवरच्या मुलांच्या मुलाखतींचा 'महाराष्ट्र टाईम्स' मधून अनुवाद दिला होता. नव्या रूपात कथा तिथे दिसली. ही खूण समीक्षकांनी ओळखायला हवी. अवचटांची 'माणसे' कथा की

लेख असा पोचट वाद करण्यापेक्षा अवचट जो नवा प्रयोग करताहेत तो कथेच्या भाग हे ओळखायला हवे आहे. कथा किती लहान असावी आणि किती मोठी असावी यांच्या मर्यादा कोणीच आखू शकत नाही. किंवा कथा एकेरी असावयाला हवी असेही नाही. परंतु हरघडी काही घटना, प्रसंग असे असतात की त्यावर कादंबरी लिहिता येणार नाही, पण कथा मात्र लिहिता येईल आणि तसे आवश्यक आणि महत्त्वाचे असे ते प्रसंग असतील. आजही.

---

## साभार स्वीकार

### समीक्षा व लेखसंग्रह

( १ ) समीक्षेची नवी रूपे : गंगाधर पाटील; मॅजेस्टिक बुक स्टॉल, मुंबई, १९८१; रु. २५

( २ ) गजेंद्रमोक्ष : डॉ. वा. के. लेले; सौ. मालती लेले, वाराणसी; १९८१; रु.२०

( ३ ) पु. भा. भावे : साहित्यरूप आणि समीक्षा : डॉ. वसंत वऱ्हाडपांडे; सौ. वसुमती वऱ्हाडपांडे, नागपूर; १९८१; रु. ६०

( ४ ) माताबळ : द. गो. गोडसे; पॉप्युलर प्रकाशन, मुंबई; १९८१; रु. १६

( ५ ) 'बहिष्कृत भारता'तील डॉ. आंबेडकरांचे स्फुट लेख—संपादन रत्नाकर गणवीर; रत्नमित्रा प्रकाशन, भुसावळ; रु. ३६

### कथासंग्रह

( १ ) ब्रेगड : योगीराज वाघमारे : हर्ष प्रकाशन, उस्मानाबाद; १९८०; रु. १२

( २ ) जलम : चंद्रकुमार नलगे; जयसिंगराव माने, कोल्हापूर; १९८१; रु. १६

( ३ ) निवडक सिंधी कथा : सविता जाजोदिया अनु. साहित्य अकादमी, नवी दिल्ली; १९८१ (कथा)

( ४ ) समुद्राकाठची रात्र : बा. भ. बोरकर; सुरेश एजन्सी, पुणे २; १९८१; रु.२०

# प्रा. व. बा. बोधे यांच्या कादंबऱ्या : एक अनावृत पत्र

अरविंद वामन कुलकर्णी

प्रा. व. बा. बोधे यांना स. न. वि. वि.

महाराष्ट्र-साहित्य पत्रिकेच्या 'ग्रामीण साहित्य विशेषांका'तील तुमचा 'मी आणि माझे साहित्य' या शीर्षकाखालील लेख वाचला. हा लेख चांगलाच उतरला आहे. तुमचे साहित्य तुमच्या जीवनातून आकारलेले आहे; म्हणजेच तुम्ही साधीत असलेल्या निर्मितीमागे तुमचे साक्षात अनुभव आहेत. अतिशय अडचणीत तुम्ही तुमचे बालपण काढलेत, शिक्षण पुरे केलेत ही निश्चितच प्रशंसाजनक गोष्ट आहे. त्याबरोबरच तुम्हाला साहित्याबद्दल वाटणारे प्रेम, वाटणारा उत्साह या गोष्टीही.

तुमच्या काही तक्रारीही आहेत. मुख्य म्हणजे त्या तुमच्यातील लेखकाने केलेल्य असल्यामुळे त्यांना लक्षणीय स्वरूप प्राप्त झालेले आहे. म्हणजेच त्यांचे स्वरूप व्यक्तिगत पातळीवरील खाजगी नाही म्हणून लक्षणीय असे मला म्हणायचे आहे. ह्यात तुम्ही तुमच्या होत असलेल्या उपेक्षेबद्दल अगदी खुल्लंखुल्ला तक्रार मांडलेली आहे. मराठी ग्रामीण साहित्यासंबंधीच्या समीक्षा विचारात व्यंकटेश माडगूळकर, शंकर पाटील व द. मा. मिरासदार ही नावे आज अडथळयासारखी झालेली आहेत; इतकेच नव्हे तर 'हे महाराष्ट्रातील ९०% वाचकांच्या डोक्यात समीक्षकांनी प्रयत्नपूर्वक ठोकलेले तीन कुऱ्हाडी खिळे आहेत. फारसे ढिले न होण्याइतपत ते पक्के बसविले आहेत' असे तुमचे मत आहे. तुमच्या मते 'खरे तर वरील त्रिकुटाची ग्रामीण कथा केव्हाच इतिहासजमा झालीय. कथाकथनाचे कार्यक्रम करून भाकरी मिळविण्यासाठीच फक्त तिचा उपयोग ठरलाय' या तुमच्या मतालाही तशी कोणी हरकत घेऊ शकणार नाही. कारण आत्मनिवेदन करता करता तुम्ही चिडेच्या भरात सहज व्यक्त केलेले ते व्यक्तिनिष्ठ मत आहे. मांडण्या न मांडण्याबद्दल प्रश्न उपस्थित करता येईल पण असे कुणाचे मत असू नये असे म्हणणे मात्र निखालस चुकीचे ठरणार.

हे कळविण्यासाठी काही मी तुम्हाला अनावृत पत्र लिहीत नाही. ते लिहितो आहे वेगळयाच कारणासाठी. तुमचा हा लेख मला खूपच लागला. अशासाठी की या लेखकाचे आपण आजवर काहीच वाचलेले नाही याची जाणीव झाली. आणि निश्चित

ती मला अस्वस्थ करणारी होती. म्हणूनच मी तुमच्या तीन्ही कादंबऱ्या मुद्दाम आणल्या आणि त्या नीट काळजीपूर्वक वाचल्या. दिलगिरीपूर्वक प्रथमत्र मी तुम्हाला हे सांगू इच्छितो की, त्यांनी माझ्यावर काही चांगला परिणाम केला नाही. थोडक्यात त्या मला आवडल्या नाहीत. एकदा असेही वाटले की, तुमच्या लेखाने वाढविलेल्या काल्पनिक अपेक्षांच्या पार्श्वभूमीवर मला त्या थिट्या वाटत असतील. मी तुमच्या लेखनाबद्दल करून घेतलेल्या अपेक्षांची पूर्ती करण्याची जबाबदारी तुमच्या लेखनाने का म्हणून पत्करावी? मग मी काही अवधी जाऊ दिला आणि त्या पुन्हा एकदा पाहिल्या.

तुमच्या लेखनात एक झिंग आहे हे खरे, पण तुमच्या लेखनाचा इतक्यातच एक साचा झाल्यासारखा झालेला आहे असे मला जाणवले. इंग्लंड-अमेरिकेतील वाचकांबद्दल असे सांगतात की, भारतासारख्या देशाच्या पार्श्वभूमीवर लिहिल्या जाणाऱ्या साहित्याबद्दल त्यांचे काही ठराबीक आडाखे आहेत. त्या आडाख्याबर-हुकूम लेखन करणारे लेखक मग अगदी (तिकडच्या पद्धतीप्रमाणे) वाचकांची भरघोस मते मिळवून लोकप्रियतेच्या पदकांचे मानकरी होतात. आपल्याकडचे कर्नल मनोहर माळगावकर हे एक असेच इंग्रजीत लिहिणारे कादंबरीकार आहेत. त्यांच्या कादंबऱ्यांनी इंग्लंड-अमेरिकेत खूप बक्षिसेही मिळविलेली आहेत. पण तुम्हाला ठाऊक आहे का, इथे आपल्यात त्यांना मिळावा असा मान समीक्षकांकडून मिळत नाही अशी त्यांचीही तक्रार आहे?

आपल्या महाराष्ट्रातही असा वाचकांचा वर्ग जुन्या काळापासून चालत आलेला आहे. तसा तो सर्वत्रच असतो या वर्गाला सतत नावीन्य हवे असते. आणि काल-मानानुसार त्याच्या नावीन्याच्या नसल्या तरी त्यातील तपशिलाबाबतच्या कल्पना बदलत असतात. या वर्गात शहरवासियांचे प्रमाण मोठे असते व आहे. त्यामुळे साहजिकच या शहरवासियांच्या अपेक्षेला महत्त्व प्राप्त होते. या वाचकांना त्यांचे दैनंदिन जीवन विसरायचे असते. कुठे तरी रमायचे असते. आणि जिथे रमायचे त्याचेही सर्वसाधारण फॉर्म्युले अपेक्षांच्या रूपाने तयार असतात. त्यात त्यांना अनोख्या असलेल्या जगाचे विशिष्ट पद्धतीत केलेले चित्रण हवे असते. मग त्यात झोपडपट्टी येते, ट्रक-ड्रायव्हर–वेश्यांचे दलाल–रेसकोर्सवरील बुकी वगैरेसारखे अनोखे व्यावसायिक येतात, ग्रामीण परिसर येतो, दलित समाज येतो इ. इ. यात कोण कोण येतो ही बाब महत्त्वाची नसते किंवा तिला चवीपुरतेच महत्त्व असते. महत्त्व असते, हे सारे अपेक्षेबरहुकूम येतात की नाही यालाच! पुण्याच्या 'मेनका' प्रकाशनाने प्रसिद्ध केलेल्या (आणि कदाचित भरपूर खपलेल्या) तुमच्या 'जंगल', 'कातीण' व 'वाघीण' या तीन्ही कादंबऱ्या मला या नव्या अभिरुचीच्या तर्पणाखातर निर्माण झाल्यागत वाटल्या.

या तुमच्या तीन्ही कादंबऱ्यांतील परिसर ग्रामीण आहेत. त्यातली व्यक्तिनामे, व्यवहार वगैरे सारे ग्रामीण आहे हे खरे. पण यातून ग्रामीण वास्तवता अर्थपूर्ण झालेली आहे वा होते आहे असे वाटत नाही. कारण ज्या कुतूहलापोटी या कादंबऱ्यांचे लेखन झालेले दिसते ते कुतूहल ग्रामीण जीवनाचा शोध घेऊ पाहणारे आहे असे कुठेच जाणवत नाही. ' जंगल 'मधील ' दलितांच्या वेदना ' म्हणजे ( दलित ) स्त्री-वरील ग्रामीण परिसरातील नाना ठिकाणी केलेले बलात्कार असे समीकरणच तुमच्या मनात असावे असे दिसते. लता नावाच्या एका दलित तरुणीची बालपणापासूनची ही कथा या कथेत लिंगपिसाटांच्या चित्तचक्षुचमत्कारिक लीला पाहायला मिळतात. तिच्या आईपासून तो मैत्रिणी आणि गावकऱ्यांपर्यंत साऱ्यांच्या कृती व उक्तीत जर कोणाला विशेष स्थान असेल तर ते गुप्तेंद्रियांनाच. कादंबरीकाराच्या कृपेनेच तोवर बलात्कारातून बचावलेल्या या देखण्या वगैरे वगैरे असलेल्या लतेवर १७ व्या प्रकरणात तान्या चव्हाण आणि शंकऱ्या यादव बांग्याच्या वाफ्यात मुक्त बलात्कार करतात. त्याचा तिला कसा कसा त्रास होतो याच्या थोड्याफार वर्णनानंतर मालक येतो आणि तो तिला ॲनासिनच्या दोन गोळ्या खाऊन गप्प बसायला सांगतो. मग तिला ' जरा धीर ' येतो. ती सूड घ्यायचेही ठरविते. तान्याला फूस लावून ती रात्रीच्या वेळी इंजिनघरात आणवते आणि ' त्येचं आंड दोन्ही हातांनी जीव खावून पिरगाळून ' त्याला मारून टाकते ! ( नायिकांनी केलेले असे खूप खून तुमच्या कादंबऱ्यांत आहेत. आणि तुमची मदत असल्यामुळे किरकोळ बोभाट्यापलीकडे त्यातून काही विशेष निष्पन्नही झालेले नाही ! ) लतेच्या या अशा मुख्य कथेला एक गाव : एक पाणवठा किंवा आंबेडकर जयंतीनिमित्त दलितांतील गटबाजीचे झालेले प्रदर्शन अशा गोष्टी जोडल्याने ग्रामीण जीवनाचे दर्शन होते का ? शोधायला गेल्यास इथे इथे ग्रामीणता आहे असे दाखविणारा पुष्कळ तपशील ' जंगल 'मध्ये सापडेल. पण तुम्ही त्याकडे बोट दाखविणार नाही अशी अपेक्षा आहे.

हाच प्रकार तुमच्या ' कातण ' आणि ' वाघीण ' या कादंबऱ्यांत आढळत नाही काय ? ' कातण 'मधील कैकाडी समाज आणि ' वाघीण 'मधील कानफाटी गोसावी व कंजारभाट समाज—म्हणजे तुम्हाला स्वतःलाही अपूर्व वाटणारं ' मराठी कादंबरी विश्वाला अपरिचित असलेल्या भटक्या जमातीचं चित्रण '—अर्थपूर्ण होताहेत असे तुम्हाला खरोखरच वाटते काय ? साहित्याच्या दृष्टीने केवळ अपरिचित समाजाचे चित्रण ही गोष्ट कितपत महत्त्वाची असते ? तुमच्या या दोन्ही ( किंवा तीन्हीही ) कादंबऱ्यांत ' अजूनही समीक्षक चवीने चघळताहेत ' अशी तुम्हाला नकोशी वाटणारी ' पाटील, बाई आणि बाटली यातच रमलेली ' तांडवावस्था दिसत नाही काय ? बाई व बाटली सर्वत्र आहे हे तुम्ही नाकारूच शकणार नाही. नाकाराल फक्त पाटील. त्याही बाबतीत तुम्ही म्हणाल की अत्याचार वा बलात्कार करणाऱ्यांत मी इनामदार,

नाईक, कदम, चव्हाण, भाना पुजारी, देशमुख असे किती तरी लोक दाखविलेले आहेत; नुसताच पाटील नाही. तर यावर नम्रपणे मी तुम्हाला इतकीच विनंती करीन की तुम्ही काहीच न म्हणणे बरे !

असे दिसते की एरव्ही तुम्हाला जे नकोसे वाटते तेच तुमच्या हातून लिहिले जाते आहे. असे का व्हावे ? तुम्ही केला आहे यावर विचार ? मला वाटते मी याआधी उल्लेखिलेला वाचकांचा वर्ग तुमच्याकडून हे लिहवून घेतो आहे. तुमच्याजवळ मुळात साहित्यनिर्मितीबद्दल आस्था आहे, उदंड उत्साह आहे; त्या दोहोंची या वाचक-वर्गाशी सांगड जुळते आहे आणि अशा कादंबऱ्या बाहेर येताहेत ! ( मग कौतुक व पैसाही मिळून जात असावा ! )

यामुळेच 'कातण'मध्ये तुम्हाला चितारायचे आहे ते 'अंगावर दैवी श्रद्धेचे पुट न चढू देणारा, देवधर्माची खिल्ली उडविणारा नायक चितारता-चितारता नियतीकडून ओरबाडले जाणारे त्याचे व्यक्तिगत भावविश्व आणि जखमी मन' वगैरे वगैरे सारे बाजूलाच राहिले आहे. आता त्यासंबंधीचा, कैकाडी समाजा-संबंधीच्याप्रमाणेच, काही तपशील अधूनमधून येऊन जातो, पण तो उपऱ्यासारखाच. तसेच 'वाघीण' या कादंबरीतील रत्ना या नायिकेच्या रूपाने 'शोशीकपणे कष्ट झेलत जगणाऱ्या या जमातीतही एक तेजस्वी स्त्री निघू शकते' हे दाखविण्याचा किंवा 'मातीत तोंड खुपसून मुक्या मनाने वेदना सोसणाऱ्या कानफटी गोसाव्यांच्या उघड्यावरील संस्कृतीचा जीवनपट उलगडण्या'चा हेतू बाजूलाच राहिला आहे. इथेही संबंधित जमातींबद्दलच्या तपशिलाबरोबर याविषयीचा थोडाफार तपशील उपऱ्या स्वरूपातच भेटतो. रत्नाचे बंड तर लेखकाच्या मदतीशिवाय प्रत्यक्षात उतरणे सर्वस्वी अशक्य अशा कोटीतलेच दाखविले गेले आहे. ती काय करते, करू शकते यापेक्षा काय करू शकत नाही असाच प्रश्न कुणीही विचारावा

या दोन्ही कादंबऱ्यांतील लिखित कथेने तुमच्या मनातील हेतूचा पराभवच केलेला आहे. असे दिसते की हे हेतू झालेत बरे, आणि खेळ जोरातच चालू आहे तो लिंगपिसाटांच्या लीलांचा आणि इतर हाणामारीचाच !

तेव्हा तुमच्या कथेच्या संकल्पना अशा एका विचित्र विळख्यात सापडलेल्या आहेत. तुमचीही त्यात थोडीफार अडचण झालेली आहे हे कुणीही समंजस वाचक ओळखील. इथे एकूण माणसाच्या सनातन कामप्रवृत्तीचा शोध घेणे हा तुमचा हेतू आहे असे म्हणावे तर तेही दिसत नाही. तर त्यांच्या म्हणजे या प्रवृत्तींच्या लीलांचे चित्रण करणे हाच हेतू आहे असे दिसते. त्यामुळे तुमची अडचण जास्तच वाढते. कारण असे पाहा की यात भाग घेणारी मुख्य इंद्रिये दोन. एक स्त्रीचे व दुसरे पुरुषाचे. तसेच त्यांच्या मीलनाचे मार्गही दोनच—एक खुषीचा, दुसरा गैरखुषीचा म्हणजे बलात्काराचा—तोही वेगवेगळ्या ठिकाणी एकाने किंवा अनेकांनी मिळून

अनुक्रमणिका

केलेल्या. तुम्ही ज्या तऱ्हेने कथेचा आराखडा घेतता आहात त्यात या चार गोष्टींचा सतत वापर होणे अपरिहार्य आहे. त्यामुळे त्यात तोचतोपणा येणेही अपरिहार्य आहे. आणि त्यात मुख्य अडचण म्हणजे तुमच्या वाचकाला तर तोचतोपणाचा विलक्षण तिरस्कार. तेव्हा या चार गोष्टींच्या एकत्रीकरणाचे नावीन्यपूर्ण पर्याय शोधण्याची महत्त्वपूर्ण जबाबदारी तुमच्यावर पडलेली. ही तुमच्यावरच नव्हे तर तुमच्यासारखे लेखन करणाऱ्या मराठीतील अनेक प्रतिथयश आणि उदयोन्मुख अशा अनेक लेखकांवरही पडलेली. अशी ही जबाबदारी मोठ्या नेकीने तुम्ही पार पाडण्यासाठी धडपड करीत आहात असे तुमच्या कादंबऱ्या वाचताना जाणवते.

यामुळे झाले आहे काय की कादंबरीच्या बाबतीत कुठल्याही प्राथमिक पोथीत सांगितले जाणारे कथानकाची रचना, स्वभावचित्रण, प्रसंगचित्रण, वातावरणनिर्मिती, रसनिर्मिती, भाषाशैली यांसारखे घटकही दुर्लक्षित झालेले आहेत. अर्थात, यालाही तुमचे वाचक तुम्हाला दोषही देणार नाहीत. कारण तुमचे किंवा तुम्ही पत्करलेल्या या संप्रदायातील सर्वच लेखकांचे वाचक तुम्हाला किंवा त्या लेखकांनाही दोष देणार नाहीत. कारण तुमच्या ( किंवा तुमच्यासारख्या लेखकांच्या ) लेखनात ज्या कृती ल प्रधान स्थान मिळालेले आहे ती कृती करणाऱ्यांच्या मनाचा, जातीचा, समाजाचा वा जीवनाचा कसलाच शोध त्यांना आवश्यक वाटत नाही. त्यांच्या दृष्टीने ही कृती महत्त्वाची; मग ती करणारा वा करणारी कुणीही असला / असली, कोणत्याही समाजातील असला / असली तरी बिघडत नाही. फक्त त्या कृतीसाठी तिथे कुणी तरी ' तो ' व कुणीतरी ' ती ' असली म्हणजे झाले !

तुमच्या कादंबऱ्यांच्या या अशा पार्श्वभूमीवर तुम्ही त्यांना जोडलेला सामाजिक संदर्भ स्पष्ट करणारा वगैरे जो मजकूर आहे तो, मला वाटते, विसंगतच ठरत जातो. की मधेच अशा सामाजिक व्यापक जाणिवा व्यक्त करण्याने लेखकाला व त्याच्या खास वाचकांनाही काही वेगळे समाधान लाभत असते ?

प्रा. बोधे, तुम्ही जे जीवन जगला आहात ते लक्षात घेतले तर ग्रामीण व दलित समाजाशी तुमचे मुळापासून असलेले नाते वरवरचे कधीही असणार नाही. तुमचे ते कष्टाचे, अपमानांचे बालपण आज जरी दूर गेलेले असले, त्या काळी भोगलेल्या दुःखावर जरी खपली धरल्यागत झालेले असले तरी त्यांच्या साक्षात अनुभवांचे विस्मरण तुम्हाला होणे शक्यच नाही. ती सारी दुःखे तुमच्या एरव्हीच्या व्यक्तिमत्त्वाचा एक भाग झालेली असणार. तुमच्या अनुभवांबद्दल साधा संशय व्यक्त करणेही मला त्यासाठीच अन्यायाचे वाटते. पण तरीही माझ्यासारखा तुमच्या कादंबऱ्यांचा गंभीरपणे विचार करणारा वाचक इतके मात्र म्हणू शकेल की, या अनुभवांना तुम्ही बळेबळे रोमँटिक मखरात बसवू पाहात आहात, आणि रोमँटिसिझमबद्दलची तुमची मते खोल तर नाहीतच, पण ती भलतीच कामचलाऊ आहेत. त्या-

मुळेच डॉ. आनंद यादवांनी ग. ल. ठोकळांना जसे मराठी ग्रामीण कथासाहित्याचे ना. सी. फडके म्हटले त्या चालीवर तुम्हाला मराठी ग्रामीण साहित्याचे चंद्रकांत काकोडकर म्हणावे लागेल. आता या उपाधीवर हक्क सांगू शकतील असे बरेच लेखक निघतील याची मला कल्पना आहे. पण या घटकेला तुम्ही नजरेसमोर आहात तेव्हा मी तुमचा हक्क सांगतो आहे इतकेच ?

एक लक्षात घ्या, तुम्ही जी दुःखे भोगलेली आहेत ती निव्वळ एकेरी व्यक्तिनिष्ठ नाहीत. त्यांचे स्वरूप सामूहिक, संमिश्र वा व्यामिश्र आहे. शतकानुशतके आपल्या समाजातील प्रस्थापितांनी सामाजिक, आर्थिक, शैक्षणिक, सांस्कृतिक, राजकीय वगैरे जीवनाच्या सर्व क्षेत्रांत केलेल्या माणुसकीशून्य अन्यायाचे अनेकविध पदर तुमच्या समाजाच्या दुःखात सामावलेले आहेत. त्यातच एक व्यक्ती म्हणून तुम्ही प्रत्यक्ष अनुभवलेल्या किंवा तुम्हावर लादल्या गेलेल्या दुःखाचे पदर त्यात मिसळले की दुःखकक्षा केव्हढी विस्तारते याची तुम्ही कल्पना करू शकाल. त्याबद्दल मी तुम्हाला वेगळे काही सांगायलाच नको. या अशा अनुभवांची वास्तवाच्या अधिष्ठानावर एखादी रोखठोक संघटना साधण्याचा तुम्ही का प्रयत्न करीत नाही ? तुमच्या आत्म-निवेदनात मला काही एक प्रामाणिक प्रयत्न करू पाहणाऱ्या लेखकाचा सूर जाणवून गेला म्हणूनच हे लिहिण्याचे मी धाडस करू धजतो आहे. यात माझी भूमिका हातात छडी घेतलेल्या पंतोजीची नाही—तो माझा अधिकारही नाही. तुमच्या लेखनाबद्दल आस्था वाटणाऱ्या एका वाचकाची ही प्रतिक्रिया आहे. त्यात अधिक-उणे काही गेले असल्यास प्रारंभीच त्याबद्दल माफी मागून ठेवतो.

साहित्याच्या क्षेत्रात समीक्षकांनी सारखा सारखा काही व्यक्तींचाच निर्देश करू नये हे तुमचे म्हणणे मला पटते, पण ' जंगल ', ' कातण ', ' वाघीण ' यासारख्याच कादंबऱ्यांची जर निपज वाढत गेली तर मग समीक्षकांनी करायचे तरी काय ? अशा पक्क्या मारून ठेवलेल्या लोखंडी खिळ्यांमुळे आपल्याला पुढे सरकता येत नाही अशी आत्मतुष्ट समजूत ज्याने निव्वळ सवंग रंजनप्रधान लेखन केलेले आहे त्याच्या बाबतीत विघातक नाही काय ? विशेषतः ज्याच्या मनात काही चांगले लिहिण्याची इच्छा आहे त्याने तरी आत्मपरीक्षणाची किमान तयारी दाखवायला नको काय ? यासंबंधीची जाणीव जर तुमच्या लेखनातून वाचकाला जाणवली तरच तुम्ही लिहिता त्या ' माझे थोडेफार ग्रामीण साहित्य म्हणजे माझा अस्तित्व टिक-विण्याचा प्रयत्न नाही. स्वत्व जपण्याची लडीवाळ धडपड आहे ' अशा आकर्षक उक्तीवर विश्वास बसेल. ही उक्ती अर्थपूर्ण बनविण्यासाठी तुम्ही यापुढे तरी प्रयत्न कराल अशी अपेक्षा आहे.

याहून जास्त काय लिहावे ? कळावे. आपला हितचिंतक.

अनुक्रमणिका

# " सौंदर्यानुभव " : एक विश्लेषण

कमलाकर दीक्षित

Science is the attempt to make the chaotic diversity of our sense experience correspond to a logically uniform system of thought.

—Einstein

एखादी साहित्यकृती आपण वाचतो. वाचल्यानंतर ती आपल्याला आवडते किंवा आवडत नाही. या आपल्या प्रतिक्रियेची कारणे शोधण्याचा आपण प्रयत्न करतो. ज्या अर्थी ही प्रतिक्रिया त्या साहित्यकृतीच्या वाचनामुळे उद्‌भवली त्या अर्थी ती कारणे त्या साहित्यकृतीतच असतील असेही आपण मानतो. ही कारणे शोधून काढून ती विश्लेषक व तार्किक पद्धतीने म्हणजे बुद्धिगम्य स्वरूपात मांडण्यात आपण यशस्वी झालो तर आपण समीक्षा केली असे म्हणता येते.

अभ्यासासाठी आशय आणि बांधणी या प्रकारे साहित्यकृती दुभागता येते. साहित्यकृतीच्या अनुभवाची कारणे आपण आशयातून शोधून काढली तर आपण आशयवादी समीक्षक ठरू. जर बांधणीतून शोधून काढली तर आकृतिवादी समीक्षक म्हणून गणले जाऊ.

मात्र या दोहोंपैकी कोणत्याही प्रकारचे समीक्षक आपण असलो तरी आपण साहित्यकृतीतील सौंदर्याचा किंवा सौंदर्यकारक गुणांचाच शोध घेत असतो. जातिव्यवस्थेवरील प्रबंध व जातिव्यवस्थेवरील कादंबरी यात सौंदर्याचाच फरक असतो.

आता साहित्यकृतीतील या सौंदर्याची कारणे शोधणे म्हणजे सौंदर्याचे निकष शोधणे असे म्हणता येईल. हे निकष आपण आशयात किंवा आकृतीत कोठेही शोधले तरी ते सौंदर्याचेच निकष असावे लागतील.

हे निकष शक्यतो जास्तीत जास्त (साहित्यकृतिनिष्ठ म्हणजे) वस्तुनिष्ठ, सर्व कलांना सामान्य व उपयुक्त असावे अशी अपेक्षा असते. त्यांच्या योगे कलाकृती म्हणजे कादंबरी कुठली व अ-कलाकृती म्हणजे प्रबंध कुठला हे सांगता आले पाहिजे. या निकषांना आपण व्यवच्छेदक निकष मानू. एकदा व्यवच्छेदक निकष हाती आले की मग पुढचे काम सुरू होते. ते म्हणजे दोन साहित्यकृतींतील डावेउजवे ठरविण्याचे.

ज्याअर्थी दोन्ही कृती आपणाला आवडल्या त्याअर्थी दोन्हींही व्यवच्छेदक निकष बाळगून आहेत. पण पहिली दुसरीपेक्षा जास्त आवडली तर ती जास्त का आवडली ? अर्थातच तिच्यात जास्त सौंदर्य भावले म्हणून. या कमीजास्त सौंदर्याच्या प्रमाणावरच साहित्यकृतींचे डावेउजवेपण अवलंबून असते. तेव्हा डावेउजवेपण किंवा प्रतवारी ठरविण्यासाठी आपल्याला वेगळे निकष शोधावे लागतील. या वेगळ्या निकषांना आपण तौलनिक निकष म्हणू.

म्हणजे समीक्षकाला समीक्षा करीत असताना सौंदर्याचे व्यवच्छेक व तौलनिक निकष शोधावे लागतात. हे निकष अनेक साहित्यकृतींच्या वाचनातून निगामी व विगामी पद्धतीने तो मिळवितो. काही वेळा वापरल्या जाणाऱ्या निकषांवर टीका होते. त्यामुळे इतर शास्त्रांकडून निकष मिळतात की काय हेही तो समीक्षक पाहात असतो. इतर कोणत्याही शास्त्राने काही निकष पुरविले तर ते सौंदर्यनिकषच असावेत, ते व्यवच्छेदक व तौलनिक असे दुहेरी असावे, इतर ललितकला निकषांना ते विरोधी नसावेत, सर्व लहान-मोठ्या साहित्यकृतींना ते लागू पडावेत अशी त्यांची अपेक्षा साहजिकच असते.

समीक्षकाचे काम होकारात्मक असते. ते आज करायचे असते. विश्वमान्य निरपवाद निकष मिळेपर्यंत ते पुढे ढकलता येत नसते. ( ढाल तुटली तरी हाताला शेला गुंडाळून लढाई करावीच लागते. शेला म्हणजे ढाल नव्हे, असे त्याला सांगणाऱ्या सौंदर्य-शास्त्रज्ञांचा त्याला उपयोग नसतो. वस्तुतः त्यांनी ढाल आणून द्यावी म्हणून तो विनवण्या करीत असतो. पण काही भाषिक तत्त्वज्ञ किंवा नेतिनेतिवादी सौंदर्यशास्त्रज्ञ तो शेलासुद्धा पळवून नेण्याचा प्रयत्न करीत असतात. हे लोक समीक्षकांचे मित्र नव्हेत. )

समीक्षकाने ज्यांना मित्र मानावे, ( जे त्याला ढाल आणून देण्याचा प्रयत्न करतात, ) जे शून्यवादी भूमिका घेत नाहीत तसे युद्धोत्तर काळातील दोन सौंदर्यशास्त्रज्ञ म्हणजे बी सी. मर्ढेकर व प्रभाकर पाध्ये.

प्रभाकर पाध्ये यांनी या सौंदर्यनिकषांच्या शोधात जवळ जवळ उभी हयात घालविलेली आहे. एखाद्या विषयाचा ध्यास घेऊन एखाद्या विधायक कामासाठी आयुष्य खर्च करणाऱ्या व्यक्ती हल्लीच्या काळात विरळ, त्यामुळेही प्रभाकर पाध्ये यांचे मराठी समीक्षेवर फार मोठे ऋण राहील.

प्रभाकर पाध्ये यांच्या " सौंदर्यानुभव " या ग्रंथावरील माझी प्रतिक्रिया व्यक्त करण्याचा मी येथे प्रयत्न करणार आहे. समीक्षेला काही निकष सापडतात की काय हे पाहणारा मी एक अभ्यासक आहे. त्यामुळे पाध्ये यांच्या ग्रंथात त्यांनी उभा केलेला जीवशास्त्रीय किंवा मानसशास्त्रीय पुराव्यांचा डोंगर मला अगम्य आहे. तसेच ज्या हेतूने मी पुस्तक वाचले त्या हेतूच्या दृष्टीने तो समजून घेणे फारसे

आवश्यकही नाही. याचा अर्थ असा नव्हे की त्या पुराव्याची गरज नाही. या पुस्तकाचे परीक्षण एखाद्या भाषिक तत्त्वज्ञाने किंवा नकारात्मक सौंदर्यवाद्याने किंवा जीवमानसशास्त्रज्ञाने केले तर ते लोक कदाचित त्यांच्या कलानिकषापेक्षा या पुराव्याचा भुगा करण्यातच रस घेतील. माझा दृष्टिकोण व गरज त्यांच्या निष्कर्षांपुरतीच मर्यादित आहे एवढेच. असो.

या पुस्तकात पाध्ये यांनी व्यावहारिक अनुभव, सौंदर्यानुभव व वैचारिक अनुभव असे अनुभवाचे तीन प्रकार कल्पिले आहेत. यांपैकी स्वरसरंजनात्मक किंवा केवला-स्वादवृत्तीची अनुभवपूर्व ( a priori ) अट या तिन्ही अनुभवांना असते. भाव सौंदर्यानुभवाचे उद्दिष्ट अनुभवाच्या प्रतिमात्मक व रसरूपरंगगंधनादादी कळा फुलविण्याचे असते. सौंदर्यानुभवाला जन्म देणाऱ्या बोधनेच्या मागे सौंदर्यवृत्ती असते. सौंदर्यानुभवामुळे आपल्या मुक्त प्रतिभेला जाग येते. नवा अनुभव आणि जुना अर्थ यांची सांगड घालणारी मनःशक्ती म्हणजे प्रतिभा. प्रतिभा बद्ध आणि मुक्त अशा दोन्ही स्वरूपांत आढळते. पैकी मुक्त प्रतिभा आपल्याला स्वप्ने पाडते व कलानिर्मितीची प्रेरणा देते. कलानिर्मितीत मुक्त प्रतिभा प्रतिभांचे माध्यम स्वीकारते. वाङ्मयातील प्रतिमा संमिश्र असतात. त्यांना सौंदर्य, संकल्पना व भावना अशी तिन्ही अंगे असतात. हे वाङ्मयाचे वैशिष्ट्य. पण काही वेळा वाङ्मयातील इतर दोन्ही म्हणजे संकल्पनात्मक व भावनात्मक ही अंगे सौंदर्यात्मक अंगाला खाऊन टाकतात. म्हणजे साधनेच साध्याला वरचढ ठरतात.

माणसाचे स्वतःचे स्वतःशी जे अतितरल नाते असते त्यातूनच त्याची केवला-स्वादवृत्ती निर्माण होते. या वृत्तीमुळे अनुभवाच्या प्रतिमात्म रचना होतात. त्याचे एक स्वतंत्र व स्वयंपूर्ण विश्व निर्माण होते. हे विश्व अन्यून–अनतिरिक्त ( monadic ) असे असते. या स्वयंपूर्ण विश्वात अनुभवांच्या तुकड्यांची एक बंदिश किंवा जाळे तयार होते. यातील प्रमुख तुकडा केंद्ररूप घेतो. इतर तुकडे दुय्यम रूपात असतात. प्रत्येक दुय्यम तुकड्याचा केंद्राशी संबंध असतो. ते स्थिरतत्त्व. तसेच प्रत्येक दुय्यम तुक-ड्यांचा इतर दुय्यम तुकड्यांशी संबंध असतो. ते चलतत्त्व. या स्थिरचल तत्त्वांमुळे एक लय निर्माण होतो. मात्र कलाकृतीचे अन्यून-अनतिरिक्तत्व किंवा लय हे कलाकृतीचे सर्वश्रेष्ठ विशेष नव्हेत. कलाकृतीतील जीवनानुभवाचा कस आणि तोल चैतन्यदायी असतो म्हणून तो सर्वश्रेष्ठ महत्त्वाचा. कलाकृतीचे अंतिम मूल्य हे तिच्यातील अनुभवाचा कस व तोल हेच होय.

हा कस व तोल कलाकृतीतील अनेकसंदर्भसूचकत्व व अर्थगौरव यावर अवलंबून असतो. हा अर्थगौरव मानवाच्या मूलभूत प्रश्नांशी म्हणजे जन्म, मृत्यू, वैषयिक आकर्षण, निसर्गाशी संबंध, नियतीचे पाश, जीवनातील सहकार्य व स्पर्धा, इ. विषयांशी जोडलेला असतो. हे विषय माणसाच्या सहजप्रवृत्तींशी संबंधित असतात.

अनुक्रमणिका

या सहजप्रवृत्ती व त्यांचे संबंध यांना संज्ञारूप पावलेली ऊर्जा किंवा आदिशक्ती म्हणतात. ही ऊर्जा किंवा आदिशक्ती वैश्विक ऊर्जेचाच अंश असते.

कलेचे प्रयोजन म्हणजे मानवाची अनुभवक्षमता म्हणजे जीवनक्षमता वाढविणे.

कलाकृतीत अनेक सौंदर्यकारक गुण असले तरी येणारा सौंदर्यानुभव एकाच जातीचा असल्यामुळे कला ही एक ' स्वभावतः वादग्रस्त ' संकल्पना आहे, हे मान्य करता येत नाही.

सारांश, प्रतिभा, कलानुभव, कलाकृतीचे रूप, लय, कलेचा परिणाम व प्रयोजन अशा सर्व बाजूंनी प्रभाकर पाध्ये यांनी या पुस्तकात कलाकृतीवर प्रकाश टाकला आहे.

पाध्ये यांनी अनुभवाचे जे तीन प्रकार कल्पिलेले आहेत ते अगदी योग्य वाटतात. या तीनही प्रकारचे शुद्ध आणि मिश्र स्वरूपाचे अनुभव माणसाला येतच असतात. त्याचप्रमाणे त्यांची स्वरसरंजनात्मक वृत्तीची अनुभवपूर्व ( a priori ) अट ही सुद्धा स्वीकारण्याजोगी आहे. कारण त्याशिवाय कलाकृती भावणारच नाही. सौंदर्य-वृत्ती, मुक्त व बद्ध प्रतिभा, याही त्यांच्या संकल्पना उपयुक्त ठरण्यासारख्या आहेत.

जीवनक्षमता वाढविणे हे जे कलेचे प्रयोजन पाध्ये यांनी सुचविले आहे ते महत्त्वाचे आहे. कलेची इतरही प्रयोजने सुचविली गेली आहेत. त्या सर्व प्रयोजनांपेक्षा हे प्रयोजन अधिक अचूक वाटते.

पाध्ये यांनी सुचविलेली लयाची कल्पना खरोखरीच फार उपयुक्त आहे. जर एखाद्या कलाकृतीला ती पूर्णांशाने लागू पडत असेल तर मग ती कलाकृती monadic असलीच पाहिजे. नाही तर तिचा लय बिघडेल. म्हणजे अन्यून–अन-तिरिक्तत्व हे वेगळे लक्षण मानण्याचे कारण नाही. ते लयात अनुस्यूतच आहे.

त्याचप्रमाणे एखाद्या कलाकृतीत पाध्ये यांच्या लयाचा अनुभव येत असेल तर मग त्यात पुन्हा चैतन्य असले पाहिजे असे जे पाध्ये वेगळे सांगतात त्याची आव-श्यकता आहे काय याबद्दल शंका वाटते. जर कलाकृतीची सामग्री मानवी अनुभव असेल तर त्याची लयबद्ध रचना झाल्यानंतर तो जिवंत आणि चैतन्यपूर्ण वाटेलच. स्थिरचलतत्त्व हे गती व हालचालच दर्शविते. कदाचित मर्ढेकरांच्या लयतत्त्वामध्ये जिवंतपणा नाही असा काही टीकाकारांनी आक्षेप घेतल्यामुळे तसाच आक्षेप आपल्या लयतत्त्वावर येऊ नये म्हणून पाध्ये हा चैतन्याचा आग्रह धरीत असतील. माझ्या मते एखाद्या कलाकृतीत मर्ढेकरांच्या किंवा पाध्यांच्या किंवा दोघांच्या लयतत्त्वांचा अनुभव येत असेल तर जिवंतपणाचा अनुभव येतच असणार.

पाध्ये यांच्या लयतत्त्वामुळे एखादी कलाकृती जिवंत का वाटते याचे उत्तर देता येईल, पण सुंदर का वाटते याचे उत्तर देता येईल काय ? कदाचित सुंदर कलाकृती जिवंत वाटते व जिवंत कलाकृती सुंदर वाटते असेही उत्तर देता येईल. हे उत्तर देता

अनुक्रमणिका

आल्यास एक मोठी अडचण मिटेल. पाध्ये यांना तसेच काहीसे वाटत असावे. ते त्यांनी अधिक स्पष्टपणे म्हणावे.

पाध्ये यांनी कलाकृतीतील आदिशक्तीला आवाहन करणारा सहजप्रवृत्तींवर आधारित असा ' अर्थगौरव ' हा तौलनिक निकष म्हणून दिला आहे अशी माझी समजूत आहे.

१. हा निकष तौलनिक म्हणून दिला असेल तर तो स्वीकारताना व्यवच्छेदक निकष सौंदर्यावर म्हणजे आकृतीवर आधारलेला व तौलनिक निकष आशयावर आधारलेला असे ठरेल. कलाकृतीच्या सौंदर्याच्या कमीजास्त प्रमाणात ती डावीउजवी ठरवायची तर तौलनिक निकषही आकृतीवर आधारलेला असणे गरजेचे आहे. नाही तर विसंगती निर्माण होईल. किंवा ही विसंगतीच नाही हे सिद्ध करावे लागेल. टी. एस. इलियटमध्ये ही विसंगती आहे. तिचे स्पष्टीकरण मिळत नाही.

२. पाध्ये यांनी हा अर्थगौरवाचा निकष तौलनिक म्हणून दिला नसेल तर मात्र त्यांच्या सौंदर्यशास्त्रात ती एक उणीव राहून गेली असे दुर्दैवाने म्हणावे लागेल. कारण लयामुळे जिवंतपणा सिद्ध होईल; पण जिवंतपणाच्या आधारावर दोन कलाकृतींत डावेउजवे ठरविता येणार नाही.

पाध्ये यांनी आपल्या पुस्तकात सर्जनशील समीक्षेची चर्चा करताना ( पृष्ठ ३१२ वर ) असे म्हटले आहे की " पण समीक्षा याहूनही सर्जनशील बनू शकते. उदाहरणार्थ, एखाद्या कलाकृतीचा, तिच्या आत्म्याचा आविष्कार व्यवस्थित झाला नसला तर तो कसा झाला असता हे दाखविता आले पाहिजे. हे दाखविता आले तर ती खरीखुरी सर्जनशील समीक्षा झाली असे म्हणता येईल. "

पाध्ये यांच्या या सल्ल्याचा आदर करून मी त्यांना एक आवाहन करू इच्छितो

पाध्ये यांना अशी भूमिका घेता येऊ शकेल की मी दोन कलाकृती वाचल्या, दोन्ही मला आवडल्या, " अ " पेक्षा " ब " जास्त आवडली. याची कारणे शोधताना मला असे आढळून आले की, " ब " या कलाकृतीत लयाच्या दुय्यम केंद्रांची संख्या अधिक होती, त्यामुळे लयसंबंधाचे जाळे अधिक व्यापक झाले, " अ " कलाकृतीत ते तितके व्यापक नव्हते.

आता ही भूमिका घ्यायची तर दोन गोष्टी कराव्या लागतील. पहिली म्हणजे सौंदर्यात जिवंतपणा गृहीतच असतो, तो वेगळा गुण नव्हे, अशी भूमिका घ्यावी लागेल व दुसरे म्हणजे गुणवत्ता आणि संख्या यांचे प्रमाण नेहमी व्यस्तच असते असे न मानता ते समसुद्धा असू शकते, असे मानणे. एकाच अंतरावर दोन दिवे असतील तर त्यांतील जास्त कँडलपॉवरचा दिवा जास्त प्रकाश देत असतो. नदीपेक्षा समुद्रात अधिक पाणी असते. ( म्हणून Oceanic feeling असा प्रयोग करतात. ) दहा कामगारांचा कारखाना चालवायला लागणाऱ्या कौशल्यापेक्षा हजार काम-

गारांचा कारखाना चालवायला अधिक कौशल्य लागते. एकपात्री नाट्यच्छटेपेक्षा बहुपात्री महाभारत लिहिणे अधिक ताकदीचे.

एक गोष्ट खरी की गुणवत्तेचे प्रमाण स्थिर असून संख्यात्मक वाढ झाली तर सरासरी गुणवत्ता खाली येते. पण समीक्षेत हा विचार नसतो. येथे आपण गुणवत्ता कमी अधिक मान्य केलेलीच असते. ती फक्त स्पष्ट करायची असते. ती स्पष्ट करताना संख्यात्मक निकष वापरला तर असलेली गुणवत्ता कमी अधिक होण्याचा प्रश्न निर्माण होत नाही.

या सूचनेमागे मर्ढेकरांच्याच व्यामिश्रतेचे तत्त्व आहे. निकष उपयुक्त ठरत असेल तर तो पाध्यांनी दिला काय, किंवा मर्ढेकरांनी दिला काय, दोन्ही सारखेच. माझ्या या आवाहनाचा पाध्ये विचार करतील अशी आशा वाटते.

(शिवाजी विद्यापीठाच्या मराठी विभागाने दिनांक ६ फेब्रुवारी, १९८१ रोजी आयोजित केलेल्या श्री. प्रभाकर पाध्ये यांच्या " सौंदर्यानुभव " या ग्रंथावरील परिसंवादातील निबंध.)

अनुक्रमणिका

# अमृतमहोत्सवाचा सोहळा

म. श्री. दीक्षित

२७ मे १९०६ रोजी पुणे येथे चवथ्या ग्रंथकारसंमेलनात सदाशिवपेठेतील नागनाथ पारानजीक मळेकरवाड्यात महाराष्ट्र साहित्य परिषदेची स्थापना झाली.

२७ मे १९८१ रोजी याच ठिकाणी सकाळी परिषदेच्या अमृतमहोत्सवी वार्षिक कार्यक्रमाचा शुभारंभ झाला. मळेकरवाडा आता अस्तित्वात नाही. त्या ठिकाणी उभी आहे चिंतामणी गृहरचना आणि 'माणूस' साप्ताहिकाचे कार्यालय. शुभारंभाचा कार्यक्रम अगदी अनौपचारिक साधेपणाने झाला. त्यातला महत्त्वाचा भाग म्हणजे—

**महाराष्ट्र साहित्य परिषदेचे जन्मस्थान : मळेकर–वाडा**
**२७ मे १९०६**

असा नामफलक पुष्पहाराने मंडित करून या ठिकाणी कायमचा लावण्यात आला. साहित्यक्षेत्रातील एका ऐतिहासिक घटनेची स्मृती या उपक्रमामुळे निरंतर राहावी हा परिषदेचा यामागील हेतू. संस्थेचे एक जुने कार्यकर्ते श्री. मो. शा. शहाणे यांचे हस्ते प्रथम फलकास पुष्पहार घालण्यात आला. नंतर या प्रसंगी आवर्जून उपस्थित असलेले नामदार श्री. वसंतराव साठे आणि श्री. श्री. ग. माजगावकर यांनीही पुष्पहार घातले. 'माणूस' कार्यालयात यानंतर सर्व उपस्थित एकत्र जमले आणि तिथे जुन्या स्मृती पुन्हा एकदा आळविल्या गेल्या. उपस्थितांत तर्कतीर्थ जोशी, नामदार साठे, मो. शा. शहाणे, गं. बा. सरदार, गो. नी. दांडेकर, वसंतराव पटवर्धन, वसंत कानेटकर, रावसाहेब बा. म. गोगटे, केशवराव कोठावळे, साहित्य परिषदेचे सर्व पदाधिकारी आणि कार्यकारी मंडळाचे सभासद, महामंडळाचे अध्यक्ष डॉ. मधुकर आष्टीकर आणि त्यांचे सहकारी, वि. र्त्र्यं. शेटे, द. मा. मिरासदार, भालबा केळकर, श्रीपाद जोशी, श्री. ग. मुणगेकर, वि. ना. देवधर असे काही पत्रकार इ. निवडक साठसत्तर मंडळी उपस्थित होती. श्री. मो. शा. शहाणे यांनी आकाशवाणीवरील मराठी भाषेसंबंधीची रास्त तक्रार बोलून दाखविल्यावर ना. साठे यांनी अशा

तक्रारी दूर करण्यास साहित्य परिषदेसारख्या संस्थांनी सहकार्य द्यावे असे आवाहन केले. चिंतामणी गृहरचना आणि 'माणूस'चे संपादक माजगावकर यांचेतर्फे ज्येष्ठांचा सत्कार करण्यात आल्यानंतर अर्ध्या तासाचा हा हृद्य सोहळा संपला.

अमृतमहोत्सवाचा मुख्य समारंभ टिळक स्मारक मंदिरात याच दिवशी सायंकाळी आयोजित करण्यात आला होता. तत्पूर्वी ५–३० वाजता नामदार साटे यांनी साहित्य परिषदेच्या कार्यालयास भेट दिली. कार्यवाहद्वय म. श्री. दीक्षित आणि न. म. जोशी यांनी श्री. साटे यांना संस्थेची सर्व इमारत प्रथम दाखवून कामकाजाची थोडक्यात माहिती दिली. नंतर पटवर्धन सभागृहात श्री. साटे आसनस्थ झाल्यावर परिषदेच्या कार्यकारी मंडळाच्या सभासदांची कार्याध्यक्ष डॉ वि. रा. करंदीकर यांनी ओळख करून दिली व नंतर सर्वांबरोबर १५-२० मिनिटे गप्पा गोष्टी झाल्या. श्री ग वा. बेहेरे, डॉ. व. दि. कुलकर्णी प्रभृतींनी संस्थेपुढील अडचणी व गरजा निवेदन केल्यानंतर श्री. साटे यांनी 'आपण शक्य ती मदत करू' असे सांगितले.

सायंकाळी ठीक ६–३० वाजता लो. टिळक यांच्या मोठ्या पुतळ्यास तर्कतीर्थ जोशी यांनी हार घातल्यानंतर मंदिरातील प्रेक्षागृहात महोत्सवास आरंभ झाला. प्रथम श्रीसरस्वतीच्या मूर्तीस आणि लोकमान्यांच्या छोट्या पुतळ्यास ना. साटे यांनी हार घातले व दीपप्रज्वलन करून औपचारिक रीत्या महोत्सवाचे उद्घाटन केले. मंदिराचे प्रेक्षागृह साहित्यप्रेमी श्रोत्यांनी या वेळी तुडुंब भरून गेले होते. व्यासपीठावर उद्घाटकांखेरीज मुख्य पाहुणे तर्कतीर्थ जोशी, परिषदेचे अध्यक्ष वसंत कानेटकर, कार्याध्यक्ष वि. रा. करंदीकर, महोत्सव समितीचे अध्यक्ष वसंतराव पटवर्धन, गो. नी. दांडेकर, मधुकर आष्टीकर इत्यादी आसनस्थ होते.

सौ. मीना जोशी यांच्या सुश्राव्य सरस्वतीस्तवनाने आणि महाराष्ट्रगीताने श्रोतृगण आरंभीच प्रसन्न झाला. वसंत कानेटकर यांच्या स्वागतपर भाषणातील 'महोत्सव, मैफल आणि मुकाबला' ही महोत्सवास उद्देशून वापरलेली विशेषणे मार्मिक नि सार्थ ठरणारी होती. स्वागतानंतर व्यासपीठावरील मान्यवरांचा परिषदेतर्फे सत्कार करण्यात आला. यानंतर न. म. जोशी यांनी संदेशवाचन केले. त्यात राष्ट्रपती, उपराष्ट्रपती, केंद्रीय शिक्षणमंत्री ना. शंकरराव चव्हाण, महाराष्ट्रकवी यशवंत, कवी कुसुमाग्रज, वा. ल. कुळकर्णी, पु. ग. मावळंकर, उपमहापौर सतीश देसाई इत्यादी महत्त्वाचे होते. (महाराष्ट्राचे मुख्यमंत्री बॅ. अंतुले यांच्या शुभेच्छा तारेने समारंभानंतर येऊन पोचल्या.)

कार्याध्यक्ष करंदीकर यांनी आपल्या प्रास्ताविक भाषणात परिषदेच्या जुन्या कार्यकर्त्यांविषयी कृतज्ञता व्यक्तवून नव्या लेखकांसाठी व नव्या साहित्यप्रवाहांसाठी परिषदेचे व्यासपीठ स्वागतशील राहील असे आवर्जून सांगितले. यानंतर स्मरणिकेचे संपादक श्री ग. वा. बेहेरे यांनी ना. साटे यांना 'अमृत-शारदे'चे प्रकाशन करण्याची

व उद्‌घाटनपर भाषण करण्याची विनंती केली. त्याप्रमाणे प्रकाशन झाल्यावर श्री. साठे यांनी सुमारे वीस मिनिटे जुन्या नव्या पिढीच्या संदर्भात आपले विचार प्रकट करून शेवटी सांगितले–' साहित्यिकांनी समाजाच्या, तसेच शासनाच्या चुका जरूर दाखवाव्या, पण त्या दाखवताना तरुणपिढीचा तेजोभंग करू नये. राष्ट्रीय एकात्मतेचा विचार प्रभावी होण्यासाठी नैराश्याची व न्यूनगंडाची भावना आपण टाकून दिली पाहिजे. हे कार्य साहित्यिकांनी केले तरच आजचे अनेक गुंतागुंतीचे प्रश्न सूर्यकिरणाने अंधकार नष्ट होतो त्याप्रमाणे नाहीसे होतील. या दृष्टीने आपला हा महोत्सव अमृतमय प्रेरणा देणारा ठरो हीच माझी सदिच्छा.'

मराठी साहित्य महामंडळाचे अध्यक्ष डॉ. मधुकर आष्टीकर आणि अकोला संमेलनाध्यक्ष श्री. गो. नी. दांडेकर यांची यानंतर परिषदेला शुभेच्छा व्यक्त करणारी भाषणे झाली. डॉ आष्टीकर यांनी परिषदेला ( त्यांच्या शब्दात मातृसंस्थेला ) या प्रसंगी रु. १००१/– ची देणगी देत असल्याचे प्रकट केले.

तर्कतीर्थ श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी आपल्या अध्यक्षीय भाषणात पुढील मौलिक विचार मांडले–

' ज्यांच्या प्रेरणेतून साहित्य परिषदेची स्थापना झाली त्यांचा साहित्यप्रकार अग्रलेख हाच होता. टिळक, खाडिलकर, शिवरामपंत यांच्या अग्रलेखांसारखे अग्रलेख लिहिले जाण्याची आज पुनश्च आवश्यकता आहे. या सर्वांनी मराठीला राजकीय जीवनाची भाषा दिली. आजमात्र या भाषेत इंग्रजी शब्दांचे प्रदूषण निर्माण होत आहे व त्यामुळे भाषाशुद्धीची चळवळ पुन्हा हाती घेण्याची गरज आहे...सत्ताधारी आणि साहित्यिक यांच्यात सतत एक प्रकारचा दुरावा उत्पन्न होतो. पण सत्ताधाऱ्यांनी साहित्यिकांच्या मनात कोणताही किंतु निर्माण होणार नाही असे वर्तन ठेवले पाहिजे. समाजापुढे कोणते साहित्य ठेवायचे याची चिंता सत्ताधाऱ्यांनी वाहू नये. कारण साहित्याची शक्ती व मूल्ये सर्वांत श्रेष्ठ असतात. शब्द ही आत्म्याची कला आहे हे लक्षात ठेवून साहित्यविचार झाला पाहिजे...जगातील कोणत्याही देशात राष्ट्रवाद धर्माभोवती उभा राहिला नाही तर भाषेभोवती उभा राहिला. अनेक भाषा, अनेक धर्म असलेला समाज राष्ट्र म्हणून उभा राहू शकतो याचे भारत हे उल्लेखनीय उदाहरण आहे. भाषाभेद, धर्मभेद विसरून मानवी ऐक्याचा विचार येथील तत्त्वज्ञानाने व संस्कृतीने दिला आहे. आजच्या सत्तास्पर्धेच्या काळात मानवी जीवनाच्या भवितव्याच्या दृष्टीने या विचाराचा प्रसार नि आचार झाला पाहिजे.'

तर्कतीर्थांच्या भाषणानंतर कार्यवाह श्री. म. श्री. दीक्षित यांनी सर्व संबंधितांचे आभार मानले. पसायदानश्रवणाने आणि प्रसादग्रहणाने या अमृतमहोत्सवाची पहिली सायंकाळ प्रसन्नतेत मावळली.

याच दिवशी रात्री १० वाजता कविसंमेलनाच्या मैफलीसाठी रसिक श्रोते मोठ्य

संख्येने उपस्थित झाले. कविवर्य बा. भ. बोरकर ( अध्यक्ष ), सुरेश भट, मनमोहन, ना. धों. महानोर आणि वसंत बापट हे पाच कवी मैफल रंगवणार होते. परिषदेतर्फे त्यांचे स्वागत करताना प्राचार्य राम शेवाळकर आरंभी म्हणाले—' येथे निरनिराळ्या पिढीतील आणि महाराष्ट्राच्या विविध भागांतील कवी एकत्र आले आहेत आणि ते सारे सुरांच्या लयींचा लळा असलेले कवी आहेत. कवी म्हणजे बोलका रसिक आणि रसिक म्हणजे मूक कवी. तेव्हा अशा रसिक कवींची मैफल आता सुरू व्हावी. '

आणि सुरुवात झाली ती सुरेश भटांच्या अर्थघन गज्जलांनी. सुरेल, भरदार आणि लवचिक आवाजात त्यांनी तीन गजला व गीते दाद घेत घेत पेश केली—

देखावे बघण्याचे, वय निघून गेले
रंगावर भुलण्याचे, वय निघून गेले
गेले ते उडून रंग, उरले ते फिकट संग
हात पुढे करण्याचे, वय निघून गेले—

यानंतर रसिकांपुढे उभे ठाकले लोककवी मनमोहन. आपल्या छोट्या छोट्या कल्पना-प्रचुर कविता पेश करताना मनमोहन आपले काव्यजीवनही चमकदार शब्दांत उधळीत गेले. ' या नदीला घाट छोटा बांधुनि मी चाललो ' असे झोकदार मस्तीत गुणगुणत या कवीने शेवटी कवीचा महिमा ऐकवून श्रोत्यांचा निरोप घेतला—

राजकीय पुरुषांची कीर्ति
मुळीच मजला मत्सर नाही
आज हुमायुन-बाबरपेक्षा
गालिब हृदये वेधित राही

रसिकांना मुजरा करत मग अजिंठ्याच्या पायथ्यानजीकच्या हिरव्या गर्भरेशमी रानात ज्याची कविता फुलली ते ना. धों. महानोर आपली रानभुली कविता आळवू लागले. श्रोत्यांच्या पसंतीच्या व काही नव्या कविता सादर केल्यानंतर आग्रहाखातर त्यांना आपली क्षितिजावरती चंद्र झुलणारी लावणी गावी लागली व तिने रसिकहृदये अल्पकाळ झुलत ठेवली.

वसंत बापट काव्यमैफलीचा फड हमखास गाजवतात. विषय कुठलाही असो, लावणीचे नुपूरझंकार आणि डफाची कडकडीत थाप त्यांच्या कवितेत उमटलीच पाहिजे. बापट अमेरिकेची नुकतीच सफर करून आले होते. तेव्हा तिथल्या वांझोट्या भोगविलासाचे चित्रण त्यांची कविता न करेल तरच नवल. तेही पुन्हा नखरेबाज. पण बापटांच्या कवितांना रसिकांनी माना डोलावल्या त्या त्यांच्या प्रभाकराची आठवण करून देणाऱ्या दोन लावण्यांनी आणि मायकेल ओंजेलोचे कलारहस्य सांगणाऱ्या उपनिषदिक छंदोगायनाने.

शेवटी उठले बोरकर आणि त्यांनी आपल्या नादमधुर आवाजात सर्वांर सर्वांची

अनुक्रमणिका

बरसात करून श्रोत्यांना डोलायला लावले. ‘ ज्ञानदेव गेले तेव्हा ’ ही त्यांची करुणोदात्त आर्त कविता ऐकताना ‘ विठ्ठल कटीत वाकला ’ तद्वत् रसिक श्रोत्यांची मनेही उन्मळून आली. पंचकवींची अमृतातेही पैजा जिंके ऐसी अक्षरे श्रवणी पडल्यामुळे परिषदेच्या अमृतमहोत्सवाची ही पहिली रात्र अक्षरशः अमृतमय झाल्याचे सर्वांना जाणवत होते.

दुसरे दिवशी ( २८ मे ) सकाळी ९-३० वाजता परिषदेच्या ‘ माधवराव पटवर्धन सभागृहा ’त जुन्यानव्या साठसत्तर कार्यकर्त्यांचा आणि काही निमंत्रितांचा एक अनौपचारिक मेळावा भरला होता. जुन्या आठवणी कथन आणि संस्थेविषयीच्या अपेक्षा बोलून दाखविणे हा मेळाव्याचा मुख्य हेतू होता व तो चांगला सफल झाला. डॉ. वसंतराव पटवर्धन यांचे अध्यक्षतेखाली झालेल्या या मेळाव्यात सर्वश्री नी. शं. नवरे, दे. द. वाडेकर, तर्कतीर्थ जोशी, स. गं. मालशे, गो. म. कुलकर्णी, व. दि. कुलकर्णी, म. वि. फाटक, पां. र. अंबिके, सरोजिनी बाबर, यशस्विनी खाडिलकर (सोलापूर), प्रा. कुसुमाकर शिंपी (धुळे), प्रा. नरहर कुरुंदकर इत्यादींनी मनमोकळेपणे विचार व्यक्त करून संस्थेविषयीची आपुलकी प्रकट केली. अल्पोपाहारानंतर दुपारी १२ वाजता हा मेळावा संपला.

महोत्सवातील शेवटचा सायंकाळचा कार्यक्रम टि. स्मा. मंदिरातील परिसंवादाचा होता. ‘ आजचे मराठी वाङ्मय समाधान देते काय ’ हा त्याचा विषय. अध्यक्षस्थानी ना. ग. गोरे आणि वक्ते प्रा. गंगाधर गाडगीळ, डॉ. गंगाधर पानतावणे, प्राचार्य नरहर कुरुंदकर आणि प्रा. सौ. पुष्पा भावे. सारेच विचारवंत वक्ते असल्यामुळे परिसंवाद रंजक-उद्बोधक न होईल तरच नवल होते. त्यातून प्रा. गो. म कुलकर्णी यांनी सर्वांचे स्वागत करताना परिचय यथायोग्य शब्दात केल्यामुळे श्रोत्यांचे औत्सुक्य अधिकच वाढले होते. विषयाच्या अनुरोधाने मग सर्व वक्त्यांनी श्रेष्ठनिकृष्ट वाङ्मयाचे निकष, कला-जीवनवाद, वाङ्मयाची सामाजिक अभिमुखता, दलित वाङ्मयप्रकाराचे मूल्यांकन, सफल-असफल असे नवनवीन वाङ्मयीन प्रयोग इत्यादी अनेक मुद्द्यांवर आपापल्या खास शैलीत प्रकाशझोत टाकले.

अध्यक्षांसह सर्व वक्त्यांनी मर्यादित वेळेत आपापले विचार प्रांजळपणे व स्वच्छ शब्दात मांडले. सारे प्रेक्षागृह त्यामुळे समाधान पावले. जो तो या बौद्धिक मेजवानीने तृप्त होऊन प्रेक्षागृहातून बाहेर पडत होता.

कार्याध्यक्ष डॉ. करंदीकर यांनी आभाराचे भाषण करताना रावसाहेब बा. म. गोगटे, श्रीमती पद्मा गोळे, ‘ सकाळ ’चे संपादक श्री. श्री. ग. मुणगेकर आणि महोत्सव समितीचे अध्यक्ष डॉ. वसंतराव पटवर्धन यांच्या सक्रिय बहुमोल सहकार्याचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख केला.

अशारीतीने परिषदेचा हा दोन दिवसांचा अमृतमहोत्सवी सोहळा संपला.

अनुक्रमणिका

सामान्यतः सर्वांच्या पसंतीस तो उतरला. कोणत्या ना कोणत्या कारणास्तव काहींचे नाराजीचे सूर कानी आले. परिषद कालबाह्य झाली असाही एक बदसूर वाचायला मिळाला.

असो. आचारविचार स्वातंत्र्याच्या काळात हे सारे अटळ असते. संस्थेचे व्यापक हित ध्यानी ठेवून कार्यकर्त्यांना जेवढे करता येणे शक्य होते तेवढे प्रांजळपणे केले. सुज्ञास अधिक सांगणे न लगे. श्री. अनिल बळेल यांचे सहकार्य हा वृतान्त लिहिताना लाभले.

---

## साभार स्वीकार

### कविता

(१) **सूर्यपंख** : डॉ. वि. गो. दुर्गे; वसुधा प्रकाशन, नागपूर; १९८०; रु. ७

(२) **वेड्या कविता** : सदानंद रेगे; पॉप्युलर प्रकाशन, मुंबई; १९८०; रु. २०

(३) **आकांताचे लेणे** : शेमा हराळे; डॉ. अरुंधती हेडा, अमरावती; १९८१; रु.१२

(४) **सिंधुलहरी** : ल. म. पटवर्धन; हर्षल प्रकाशन, पनवेल; १९८०; रु. ११

### कादंबरी

(१) **तीन तरुण, दोन तरुणी आणि एक बंड** : डॉ. भाल पाटील; पॉप्युलर प्रकाशन, मुंबई; १९८१; रु. ५०

(२) **तन मन धन** : माधव कानिटकर; इंद्रायणी साहित्य, पुणे ३०; १९८१; रु. १५

(३) **चक्रवर्ती** : मालती दांडेकर; कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे; १९८१; रु. ३०

(४) **क्रांतिकारी कफल्लक** : शांताराम गरूड, मागोवा प्रकाशन, पुणे २; २० रु.

# पुस्तक-परीक्षण

## मराठी कविता : जुनी आणि नवी

**वा. ल. कुळकर्णी, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९८०**

" मराठी कविता : जुनी आणि नवी " हे प्रा. वा. ल. कुळकर्णी यांचे ' पॉप्युलर प्रकाशन 'चे १९८० मध्ये प्रसिद्ध झालेले पुस्तक आहे. वा. ल. कुळकर्णी हे मराठी-तील एक प्रस्थापित, नामवंत व ज्येष्ठ समीक्षक आहेत. त्यांनी काही निमित्ताने व स्वतंत्रपणे लिहिलेल्या समीक्षात्मक लेखांचे हे संकलित स्वरूपाचे प्रकाशन आहे. प्रस्तुत लेखसंग्रहाचे दोन विभाग आहेत. पहिल्या विभागात प्राचीन मराठी कवितेच्या संदर्भात आठ लेख असून दुसऱ्या अर्वाचीन कवितेच्या विभागात अकरा लेख समाविष्ट केले आहेत. पहिल्या विभागात प्राचीन मराठी कवी ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम, मोरोपंत इ. कवींच्या काव्यलेखनाचा शोध आहे. दुसऱ्या विभा-गात अर्वाचीन मराठी कवी केशवसुत, बालकवी, तांबे, बोरकर, कुसुमाग्रज, इंदिरा संत, पु. शि. रेगे, मंगेश पाडगावकर आणि सदानंद रेगे इ. कवींच्या काव्यकर्तृत्वाचे मूल्यमापन आहे.

या दोन विभागांतून मराठी कवितेचा विकास कसा झाला आहे, तिचा प्रवास कोणत्या वळणांनी घडला आहे, त्यामागे कोणत्या प्रेरणा आहेत इ. चे मार्गदर्शन केले आहे. ज्ञानेश्वरांच्या ' इवल्याशा वेलू 'पासून सदानंद रेगे यांच्या ' अक्षरवेली-पर्यंतचा ' हा प्रवास सहज डोळ्यात भरण्यासारखा आहे. प्रत्येक महत्त्वाच्या वळणा-वर एकेक कवी उभा आहे. आणि त्या कवीच्या काव्याचा मूलगामी शोध घेण्याचा यशस्वी व सुखद प्रयत्न वालं नी केला आहे. या लेखसंग्रहामागची भूमिका स्पष्ट करताना वा. ल. कुळकर्णी यांनी प्रस्तावनेत म्हटले आहे, " या संग्रहातील एका लेखाचे शीर्षक ' कुसुमाग्रज : एका मनाचा शोध ' असे आहे. खरे म्हणजे ते या संग्रहातील सर्वच लेखांचे शीर्षक असायला हरकत नाही. आपण एखाद्या कवीची कविता वाचतो तेव्हा आपला परिचय होत असतो तो एका कविमनाशी : हा परिचय जसजसा वाढत जातो तसतसे आपण त्या मनाच्या कुतूहलाचे आणि चिंतनाचे विषय काय

आहेत, त्याची स्वप्ने काय आहेत, आदर्श काय आहेत, ज्या अनुभूती ते व्यक्त करू पाहते त्यांचे स्वरूप काय आहे, त्याच्या कल्पनाशक्तीची झेप किती आहे, ज्या काव्यपरंपरेत ते वाढले तिच्याशी त्याचे नाते काय आहे, ती परंपरा या मनाने किती समृद्ध केली आहे यांसारखे अनेक प्रश्न स्वतःला विचारू लागतो व त्यांची उत्तरे शोधू लागतो. यातूनच आपली काव्यसमीक्षा रूप घेते." (प्रस्ता. पान २) या दृष्टीने समीक्षकाला आकृष्ट करणाऱ्या काही 'कविमनांचा शोध' हे या लेखसंग्रहाचे उल्लेखनीय वैशिष्ट्य होय. समीक्षकाने स्वीकारलेली ही भूमिका प्रत्येक लेखातून सफल झाली आहे असे दिसून येते. उदाहरणार्थ– ज्ञानेश्वरांच्या कल्पनाशक्तीचे स्वरूप स्पष्ट करताना, ज्ञानेश्वरीतील श्रोता-वक्ता संवादाचे प्रसन्न स्वरूप लक्षात घेतले पाहिजे हे आवर्जून सांगितले आहे. ज्ञानेश्वरांच्या आविष्कारपद्धतीवर या संवादशैलीचा प्रभाव पडलेला आहे. "ज्याची झेप प्रचंड आहे, निर्वेद हाच ज्याचा स्थायीभाव आहे आणि अठराव्या अध्यायात सांगितलेली ज्ञानी भक्ताची सर्व लक्षणे ज्याच्या ठिकाणी मूर्तिमंत झाली आहेत असे ज्ञानेश्वर हे मन आहे, 'ज्ञानेश्वरी' म्हणजे या मनाचे बोल आहेत, ती एका आनुभविकाची वाणी आहे.'" (पान ३) या प्रकारच्या विवेचनातून अर्थातच कविमनाशी 'संवाद' साधला जातो आणि काव्याचे रहस्य उलगडण्यास मदत होते.

आपल्या अशा प्रकारच्या आस्वादकाच्या भूमिकेबरोबर वा. ल. कुलकर्णी यांच्यात असलेला समीक्षकही जागृत दिसतो. त्यामुळे विवेचनाच्या ओघात त्यांनी वेळोवेळी काही महत्त्वाचे वाङ्मयीन प्रश्नही निर्माण केलेले असतात, हे लक्षात घेतले पाहिजे. ज्ञानेश्वरांच्या अभंगवाणीचे मूलस्वरूप उलगडून सांगताना काव्यप्रकारांच्या संदर्भात त्यांनी एक प्रश्न निर्माण केला आहे. ते म्हणतात — "ज्ञानेश्वरांच्या पाळणा, घोंगडी, पाईक, हमामा, अंतुला, विरहिणी, डौर, सौरी, फुगडी, पांगूळ, आंधळा ह्या नावांनी ओळखल्या जाणाऱ्या अभंगांनी एकनाथी भारुडांच्याच नव्हे तर एकंदर भारूड वाङ्मयाचा पाया घातला. ही सर्व रूपकेच आहेत." (पान ११) नाट्य आणि अध्यात्म या दोन्ही दृष्टींनी अभंग व भारूड हे दोन्ही प्रकार महत्त्वाचे आहेत. असाच एक प्रश्न नामदेवांच्या अभंगवाणीचे स्वरूप सांगताना त्यांनी उपस्थित केला आहे. नामदेव आणि एकनाथ यांच्या अभंगांमध्ये आढळणाऱ्या 'गौळणी' वाचत असताना त्यात प्रकट होत असलेला शृंगारभाव हा भक्तिभावा-पोटीच जन्मला आहे, हे जाणवत असूनही, त्यांच्या मनात एक विचार आल्या-वाचून राहात नाही; व तो म्हणजे ह्या गौळणींचे मराठी लावणीवाङ्मयाशी असणारे थोडेबहुत प्रकृतिसाम्य! ते म्हणतात— "मराठी लावणी ही मराठी गौळणीमधून उत्क्रान्त झाली आहे असे येथे सुचवायचे नाही. सुचवायचे आहे ते एवढेच की, मराठी लावणीचा उदय होण्यापूर्वी अनेकदा वस्तुतः भक्तिभावापोटी जन्माला येणारी

गौळण ही लावणीसदृश भाव व्यक्त करिताना आढळत होती." (पान २७) आणि आज तमाशातील बाई लावणीबरोबर लोकाग्रहास्तव तितक्याच नाट्यपूर्णतेने गौळण म्हणू शकते असे स्पष्टीकरण ते पुढे करतात. वा. ल. कुळकर्णी यांनी विवेचनाच्या ओघात मराठीतील काव्यप्रकारांचे साम्यभेदाचे नाते, किंवा परस्परसंबंध अशा चिकित्सक वृत्तीने, अतिशय सावधपणे तपासून पाहिले आहेत.

त्याचप्रमाणे समीक्षकाची साक्षेपी वृत्तीही सतत व्यक्त होते. 'नामदेवचरित्र' लिहून नामदेव हा आद्यचरित्रकार व आत्मचरित्रकार कसा ठरतो याचे प्रतिपादन त्यांनी केले आहे. तुकारामाच्या कवितेविषयीचा प्रदीर्घ लेख मुळातून वाचण्यासारखा आहे. तुकारामाची अभंगवाणी ही महाराष्ट्रवाणीचा एक अविभाज्य घटक बनली आहे, आपले वाङ्मयधन लोकधनाच्या पदवीला तुकारामाने नेले आहे हे सर्व विवेचन पटण्यासारखे आहे. त्याबरोबर तुकारामाच्या शैलीचें मर्ढेकरांच्या शैलीशी साम्य त्यांनी स्पष्ट केले आहे. "कवितेची भाषा म्हणजे सरलोक्ती—वक्रोक्ती नव्हे," असे म्हणून त्यांनी 'कवितेची भाषा' या विषयावर यथायोग्य विवेचन केले आहे. एका ठिकाणी ते म्हणतात— "ज्या प्रमाणात कवितेची भाषा ही कवितेची तथाकथित भाषा बनू लागते, Stylized होते, कवितेच्या भाषेसंबंधीचा शिष्टसंमत उपचार पाळू लागते, त्या प्रमाणात तिचा 'अर्थ' लक्षात घेणे सोपे होत जाते, परंतु मौज अशी आहे की ह्यामुळेच तिच्यात मग 'कविता' या दृष्टीने फारसा अर्थ उरत नाही" (पान ९६). यामुळे कवितेच्या भाषेविरुद्ध 'बंड' पुकारले जाते व ज्ञानेश्वर, नामदेव, तुकाराम, केशवसुत, मर्ढेकर यांनी आपल्या कवितेची औपचारिकतेपासून सुटका करण्याची जणू पराकाष्ठा केली, असे म्हटले आहे. पहिल्या विभागाच्या शेवटी 'गीत : प्राचीन आणि अर्वाचीन' हा लेख समाविष्ट करण्यात आला आहे. यात गीत, भावगीत, कविता यांचा परस्परसंबंध स्पष्ट केला आहे. गीताचे स्थित्यन्तर व स्वरूपान्तर कसे घडत गेले, गीताची सांकेतिकता, त्याचे गट, श्रोतृसापेक्षता इ. ची चर्चा सविस्तर केली आहे. या चर्चेत अभंगाविषयी एक लक्षणीय स्वतंत्र विशेष मांडला आहे. मुळातील काव्यवाहक अभंगाचे भक्ती साधनस्वरूप जाऊन त्याला स्वतंत्र काव्यप्रकाराचा दर्जा प्राप्त झाला आहे. ते म्हणतात— "अभंग हा छंद-प्रकार नसून तो काव्यप्रकारच आहे हे लक्षात घेणे आवश्यक आहे." (पान १२५)

गीत या विषयावर अशी पूरक चर्चा 'तांबे, यांच्या काव्या'च्या विवेचनात याच पुस्तकात (पाने १५९-१६१) केलेली आहे. तांबे यांच्या गीतांचे स्वरूप अनुभवनिवेदनात्मक, अनुभवस्पष्टीकरणात्मक, अनुभवविस्तारक आहे हे सांगून त्यांची कविता बहिर्मुख आहे, ती केशवसुतांच्या 'झपूर्झा'सारखी अंतर्मुख नाही हा भेद सांगितला आहे. तांबे यांचा वारसा रविकिरण मंडळातील कवींत व ना. घ. देशपांडे, बा. भ. बोरकर, ग. दि. माडगूळकर यांच्या गीतपरंपरेत शोधता येईल

असा निर्वाळा दिला आहे.

नवकवितेविषयी वा. ल. कुळकर्णी यांनी आस्थेवाईक, उदार व समंजस दृष्टिकोण सतत व्यक्त केला आहे. मंगेश पाडगावकर, पु. शि. रेगे, बा. सी. मर्ढेकर, सदानंद रेगे, इंदिरा संत या कवींच्या प्रारंभकाळीच ते या कवींकडे आकृष्ट झाले आहेत व त्यांच्या काव्यातील मूलशोध घेऊन या कवींविषयी त्यांनी आश्वासक उत्तेजन देण्याची निर्भय स्वागतशीलता प्रकट केली आहे. मर्ढेकरांच्या कवितेतील अर्थसंगती लावताना प्रथम आपण अपुरे पडतो ही सार्वत्रिक प्रतिक्रिया त्यांनी जशी निर्मळपणे नोंदवली आहे तशीच ' मर्ढेकरांची कविता अंगासरशीच आहे ', असे म्हणून आपल्याला त्यातील अपुरेपणा जाणवणार नाही इतपत मार्गदर्शन केलेले दिसते. पु. शि. रेगे यांची कविता अशीच प्रथम ' चमत्कारिक वाटते ' व नंतर आपण तिचे ' समजूतदार वाचक ' कसे बनलो हे सांगताना त्यांनी जी भूमिका घेतली आहे ती काव्याच्या परिशीलनासाठी नेहमी मननीय व अनुकरणीय वाटावी अशीच आहे. ते म्हणतात— " आपण वाङ्मयीन संकेतांचे गाठोडे घेऊन सदैव वावरत असतो. एखाद्या काव्याचे वाचन करताना हे गाठोडे दूर ठेवणे अगत्याचे असते. गाठोडे दूर ठेवून निर्विकल्प मनाने आपल्या समोरील वाङ्मयकृतीचा आस्वाद आपल्यापैकी कितीजण घेऊ शकतात ! " ( पान २३३ ) काव्यसमजुतीच्या आपल्या हट्टीपणाच्या कल्पना सोडून देऊन आपण काव्यास्वादात समरस झाले पाहिजे ही भूमिका आस्वादकाच्या समजूतदारपणातून येत असते.

मंगेश पाडगावकरांच्या ' जिप्सी'ची प्रस्तावना, सदानंद रेगे यांच्या 'अक्षरवेली '-ची प्रस्तावना यांचा समावेश या लेखसंग्रहात केलेला आहे. वा. ल. कुळकर्णी यांना त्या वेळी जे जाणवले व जे अंदाज त्यांनी केले त्याचा प्रत्यय या कवींच्या अलीकडच्या काव्यसाधनेतून येत आहे. वालंना अभिप्रेत असलेली पाडगावकरांची चिंतनशीलता अनंत अनुभवविश्वाचे दर्शन घेण्यास आज सिद्ध झालेली दिसते. अनेक अंगांनी पाडगावकरांची कविता आज विकसित झालेली दिसते.

याप्रमाणे ही समीक्षा आक्रमक न बनता, कोणत्याही 'वादा'त न अडकता, कलाकृतीच्या अंतःप्रवाहाचा शोध घेऊन त्या मूलस्रोताबरोबर प्रवास करताना दिसते. त्या विशिष्ट कविमनाशी मैत्रीचे नाते बांधून जणू काही त्याच्याशीच ' संवाद ' करीत एक प्रकारे ' संवादशैली'तून ' प्रकट होत असते. प्रत्येक वेळी समीक्षकाचा एक प्रकारचा वेगळेपणा, अलिप्तता व संयम जसा जाणवतो तसाच त्याच्या सलग, एकात्म व रसाळ विश्लेषणाचा ठसाही मनावर उमटतो. खऱ्या सहृदय समीक्षकाने रसिक कलावंताची भूमिका घ्यावी असे जे म्हटले जाते त्याचा नेमका प्रत्यय येथे येत असतो.

वा. ल. कुळकर्णी यांच्या लेखनात वेळोवेळी चिंतन केलेल्या तपशिलाचे परिच्छेद

अनुक्रमणिका

असतात हे दिसून येईल. आपली 'वाङ्मयीन दृष्टी आणि दृष्टिकोण' स्पष्ट करताना त्यांनी म्हटले आहे[१]—"माझ्या इतर लेखनाप्रमाणेच त्यांचे लेखनही मुख्यतः स्वतःच्या शंकांच्या समाधानार्थच झाले आहे.!" अर्थात या त्यांच्या शंका मूलभूत आणि त्यांचे निराकरणही 'समाधानकारक' झालेले दिसते. यामुळे प्रश्न निर्माण करणे व त्याचे उत्तर शोधण्याचा प्रामाणिक प्रयत्न करणे (Loud thinking) या प्रक्रियेतच त्यांनी त्यांची 'समीक्षा-पद्धती' आखली आहे. यामुळे स्वाभाविकपणे 'संवादशैली' सारखे हे लेखन होत असावे. परिच्छेद स्वतंत्र वाटले तरी मूळ विषयाशी तर्कसुसंगत आंतरिक संबंध कायम राहतात हे या पद्धतीचे वैशिष्ट्य होय.

प्रस्तुत लेखसंग्रहातून 'काव्याच्या प्राचीन आणि अर्वाचीन' प्रवाहांचा प्रमुख विषय असल्याने, वा. ल. कुळकर्णी यांनी विवेचनाच्या ओघात, काव्यविषयक काही महत्त्वाचे प्रश्न घेऊन त्यांची समर्पक चर्चा केली आहे. काव्याचे स्वरूप, त्याचे अंतर्गत घटक, त्यांचा परस्परसंबंध, कलाकृतीची भावसंघटना, विशुद्ध भावकविता, कलेचा अनुभव, शब्द प्रतिमा व सौंदर्यानुभूती, आत्मनिष्ठा तसेच कवी व वाचक संबंध इत्यादी अनेक विषयांवर विवेचन आले आहे. हे विवेचन कलेच्या प्रांतातील मूलभूत जाणिवांचे दर्शन घडविणारे असल्याने ह्या लेखांचे महत्त्व अधिक आहे. वाचकांची 'जाणीव कक्षा' विस्तारणारी ही 'कलात्म-समीक्षा' आहे. या लेखांचे स्वरूप आस्वादक, आत्मप्रत्ययात्मक प्रतिक्रिया नोंदविणारे वाटले तरी या प्रतिक्रिया मूलभूत व प्रातिनिधिक स्वरूपाच्या असून त्यात अचुकता व सुसंगती आहे, हे विसरून चालणार नाही.

या लेखसंग्रहाला काही मर्यादाही आहेत. हे लेख १९६० च्या आसपास लिहिले आहेत. "१९६० नंतर मी आजचे कवी आणि त्यांची कविता यावर फारसे लिहिले नाही" असे समीक्षकाने प्रस्तावनेत (पान २) म्हटले आहे. काही वेळापूर्वी लिहिले होते त्यात भर घालणारे असे लेखन यात समाविष्ट केले आहे. उदा. 'तांबे यांच्या कवितांच्या निमित्ताने' या लेखानंतर 'डोळे हे जुल्मि गडे' या कवितेचे रसग्रहण

.................................

१. "हा माझा चौथा लेखसंग्रह. ह्या पूर्वीच्या संग्रहातील लेखांप्रमाणेच ह्या संग्रहातील लेखांचे स्वरूपही टिपणवजाच आहे. त्यात अनौपचारिक चर्चेचा भागच अधिक आहे. काही साहित्यप्रकारांसंबंधी आणि वाङ्मयीन प्रश्नांसंबंधी मी जो वेळोवेळी विचार केला त्यातून ही टिपणे जन्माला आली. माझ्या इतर लेखनाप्रमाणेच त्यांचे लेखनही मुख्यतः स्वतःच्या शंकांच्या समाधानार्थच झालेले आहे."

(प्रस्ता. पान ११)

[ 'वाङ्मयीन दृष्टी आणि दृष्टिकोण' वा. ल. कुळकर्णी, पॉप्युलर प्रकाशन, १९५९ ]

छापले आहे. प्रस्तुत रसग्रहण 'मधुघट–रसदर्शन'[२] १९७५ या काळातील आहे. एकूण त्या कवीच्या काळाच्या संदर्भात, त्याच्या काव्याचा विचार करणारी ही समीक्षा आहे. तरीही स्वतः त्यांनीच म्हटल्याप्रमाणे प्रस्तुत संग्रहातील हे, 'लेख म्हणजे त्या कवींच्या संपूर्ण काव्यलेखनाचे अभ्यास नव्हेत हे सांगायला नकोच!'

तसेच या लेखांपैकी बरेचसे लेख आकाशवाणीची भाषणे, काव्यसंग्रहाच्या प्रस्तावना, अध्यक्षीय भाषणे इत्यादी स्वरूपाचे असून बरेचसे लेख वा. ल. कुळकर्णी यांच्या आधीच्या समीक्षणात्मक पुस्तकात समाविष्ट झालेले आहेत. यावरून काही वाचकांच्या मनात प्रश्न निर्माण होण्याची शक्यता आहे की, "मग या पुस्तकाची काहीएक गरज होती का?" सुमारे एका दशकापूर्वी एका समीक्षकाने[३] लिहिले होते—"वा. ल. कुळकर्णी यांच्या लेखनाचे सातत्यही आता 'विरळ' होत आहे. त्यांच्या समीक्षालेखनाचे संग्रह एका मागोमाग प्रसिद्ध झाले आहेत. आपल्या विचारांचे संकलित दर्शन वाचकांना घडावे असा हेतू या प्रसिद्धीमागे असण्याची शक्यता आहे. त्यांची वृत्ती सौजन्ययुक्त व स्वागतशील असल्याने आणि त्यांची उद्योगप्रियताही अधिक असल्याने, त्यांचे लेखन चालू राहील पण त्यामुळे त्यांच्या आजवरच्या समीक्षाविचारात महत्त्वाची भर पडेल असे वाटत नाही." याचीही आठवण काही वाचकांना होणे शक्य आहे.

'मराठी कविता : जुनी आणि नवी' या लेखसंग्रहात त्यांचे कवितेसंबंधीचे 'संकलित विचारदर्शन' प्रामुख्याने घडते आणि या दृष्टीनेच मराठीचे काव्यप्रेमी वाचक आणि जिज्ञासू अभ्यासक यांना या प्रस्तुत लेखसंग्रहाची अपरिहार्य उपयुक्तता वेगळी सांगण्याची गरज नाही!

**प्रा. शरद रामचंद्र देव**

२. 'मधुघट, रसदर्शन'—संपादक वा. रा. ढवळे, पान–२ ते ६, महाराष्ट्र राज्य शिक्षण विभाग १९७५, [या पुस्तकाचा उल्लेख मात्र केला नाही]

३. महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका—वाङ्मयसमालोचन विशेषांक-समीक्षा १९६९, म. द. हातकणंगलेकर, पान १८, अंक–१७६–१७७, जानेवारी ते जून १९७१.

## ' पहाट '

**नीळकंठ महाजन**

जुन्या प्रचलित शब्दांच्या अर्थझिजल्या आकारांनी नवकवी नवे पैलू देतात. पण जेव्हा हा अट्टाहास होतो, तेव्हा कविता शब्दबंबाळ होण्याची शक्यता असते. शब्द कवितेच्या अनुभवाला गुदमरून टाकतात. त्यामुळेच जुन्या शब्दांना नवी चेतना देण्याचा प्रयत्न त्यांना पुनर्जन्म देतो. महाजनांच्या कवितांमधून जुन्या शब्दांचे हे सामर्थ्य नव्याने जाणवते. अनुभव आणि सूर या दोहोंचा प्रामाणिक सूर हे ' पहाट ' चं वैशिष्ट्य ठरतं.

निसर्ग हा त्यांच्या अनुभवाचं माध्यम असला तरी अनुभवाला गुदमरून टाकत नाही. दिवस, सायंकाळ, रात पहाटतानाचे विश्व तिच्या देषांतरातून उलगडते. ( देषांतर ) त्यांची कविता स्वतःत असणाऱ्या अंधाराचे दर्शन घेणारी, त्यातील भयानकतेने व्याकुळलेली आहे तरी दुःखमळूल गाण्यातही वेगळे रंग शोधणारी आहे. त्यांच्या स्वत्वाची जाणीव ' होकार ', ' कावळा ' या कवितांतून होते. शब्दांची अर्थघनता दिसते.

> " मी स्वतःच डुंकून पाहतो.
> डोक्यातल्या खोल विहिरीत
> जरा वेळ काळजात पाण्यासारखी
> हलते भीती "

आपल्यातील अमानुषत्वाचा साक्षात्कार झालेले हे मन नंतर कवितेत साकार होते. गर्दीतही बोचणारी ही भयकारी शांतता मग भयानक होऊ लागते.

> " डोळ्यातल्या धुळीत लोळतात
> पाखरांशी झालेले करार "

असे हे गूढ करार महाजन आपल्या कवितांत करतात. त्यावर स्वप्नं अलगद उतरतात. आणि ' अंगभर फुटते पहाट चैतन्याचं लेणं लेवून. " अशी अपूर्वाई होते.

महाजनांची कविता एखाद्या चित्राप्रमाणे आहे. जोशपूर्ण फटकाऱ्यांनी त्यांच्या ' रस्ते, काळोख आणि स्त्री 'ला जिवंत केलं आहे. त्यांचे कवित्व केवळ छायाचित्र-काराची हुबेहुबता देत नाही, तर नाकडोळ्यांना उठाव आणते; आणि सपाटपणा घालवून टाकते.

अनुक्रमणिका

त्यांच्या स्त्रीमध्ये त्यामुळेच केवळ देह आहे असे नाही, तर स्वभाव आहे. 'भेट', 'आठवणींचा किडा' यामध्ये तर ती स्वतःच्या व्यक्तिमत्त्वासकट उभी राहते.

"माझ्याने चालवलं जाईल.
एवढ्या दूर जागा शोधून थांब" (भेट)

असं एकमेकांना सांगून आपलाच पल्ला दोघं शोधतात डोळ्यांच्या वाटेने जाऊन.

'सूर्याचं बोट' धरणारी ती त्याचे नवे नवे हात नव्या अंगाने अनुभवते, तर 'वादळ' मध्ये रात्रीच्या वादळातलं हरवलेपण प्रकाशात विसरून जाण्याचं ठरवते. 'पानं हालतात' तेव्हा पानांच्या हलत्या सावलीतून झुळझुळतं बोलत राहते. त्यांची स्त्री केवळ प्रिया नाही तर उपेक्षित स्त्रीत्वाच्या व्यथा 'तुझ्या व्यथांचे गाणे' आणि 'सावली' यातून व्यक्त होतात.

"प्रकाश उधळून तुझे डोळे
लपवतात काळोख स्वतःच्या शापाचा"

कवीला वाटणारे रस्त्याचे आकर्षण हे त्यांचे आणखी एक वैशिष्ट्य. प्रत्येकाच्या वाट्याला येणारे, पण कोणाचेच नसणारे हे रस्ते, लांबच लांब पसरणारे, आपल्या वाटेने जाणारे हे रस्ते कधी 'मार्ग' होत नाहीत.

"हा तेवढ्यापुरता टिकणारा प्रकाश नकोसा झालाय
पाताळात फक्त काळोख असणार,
काळोख तरी सातत्यानं साथ देतो
काय ते अनुभवायचंही"

असा हा अंधारलेला रस्ता आहे. पण म्हणूनच शाश्वत आहे. आभाळ डोकावणारा रस्ता तकलुपी प्रकाशाचा आहे; नकोसा वाटणारा आहे. तिथे

"ओळखीच्या वाटेवरी अनोळखी पायखुणा"

असा अनुभव येतो आणि कवी मोडून जातो.

पण सर्वात जास्त जाणवतो तो त्यांचा 'काळोख'. आरती प्रभूंच्या काव्यातून दिसणाऱ्या अंधाराप्रमाणे हा समृद्ध नाही पण वेगळेपणा असणारा आहे.

रस्त्यांवरील कवितांमधून काळोखाची शाश्वत सोबत आहेच, पण 'झाडाखाली' या कवितेत ती सोबत वेगळी ठरते. 'ती' फुलांच्या झाडाखाली निजलेली असते; अंधाराची जाणीव नसणारी, हा अंधार त्याच्या जीवावर उठू पाहणारा, सारे बांध तोडून टाकायला सांगतोय. त्याच्या मनातला सूर्य मावळायला अधीर होतो. पण तिची निरागसता त्याला पुन्हा थांबवते. आणि म्हणूनच तो तिच्या उगवण्याची वाट पाहतोय.

अनुक्रमणिका

याउलट ' आठवणींचा किडा ' या कवितेतला अंधार, रात्रीच्या काळोखातला उद्ध्वस्तपण सूर्याच्या प्रकाशात जास्तच गडद होते. म्हणूनच काळोखाचा आधार वाटतो, तो हवासा वाटतो.

' अधांतर 'मध्ये या उजेडाचा प्रवेश नको वाटतो. " काळोखाला ओसरायची घाई होतेय " अशी चुटपुट लागते. ही नको असलेली जाग सहज ' येत ' नाही तर ' पेटते. '

या काळोखात सातत्य आहे म्हणून हवा आहे. त्यांना रंगांचं जग नकोय असे नाही, पण आकाशाचा अर्थ शोधताना पाखरांशी झालेले करार धुळीला मिळतात तेव्हा अंधारच शाश्वत वाटतो. पाखरांचे रंग खोटे वाटतात. मुख्य म्हणजे या काळोखाला एक लोभस अंग आहे आणि त्यासाठीच तो हवासा वाटतो, कारण ती " अंधाराच्या आडोशाला " उभी असणारी आहे, तिची 'लाजरी पावले' पहाटतात अंधारातच.

महाजनांच्या काव्याचा हा असा बहुढंगीपणा आहे. आवेग हा त्यांचा मोठा गुण. तो आवेगाचा क्षण, त्या क्षणाची गती पकडायचा त्यांचा प्रयत्न ' निर्माता 'सारख्या कवितेतून दिसतो.

" कळी खुडताना आपणच अर्पून द्यावे आपले हात "

असं ते म्हणतात. पण हा आवेग बंडखोर नाही. संयमी आहे.

" मीच किती कठोर झालोय
वाऱ्याच्या वहाणा मागतोय
पूर्वी कधी पाहिलेले तुझे डोळे आठवतोय "

आणि म्हणूनच जिथे आवाज उंचावतो तेथे स्वतःच आपल्या उसळतेपणाला घातलेला आवर आहे. ' आपण अगदी गप्प असावं 'मध्ये ते समजू शकेल.

कवीच्या कवितेची ही ' पहाट ' आहे. त्यात पहाटेची असणारी नव्हाळी आहे. पुढच्या फुलत्या दिवसाच्या खुणाही आहेत.

कु. मृणालिनी ना. नाडकर्णी

अनुक्रमणिका

## महाराष्ट्र-साहित्य-परिषद, पुणे ३०

## १९८०-८१ चे कार्यवृत्त

परिषदेच्या विद्यमान कार्यकारी मंडळाच्या दुसऱ्या वर्षाचे कार्यवृत्त सादर करीत आहोत.

**सभासद संख्या :**

| वर्ग | संख्या |
|---|---|
| आजीव | १०८० |
| साधारण | १२३० |
| एकूण | २३१० |

निधन पावलेल्या आणि वर्गणीच्या अभावी कमी झालेल्या सभासदांची घट वजा जाता वर्ष अखेरची ही संख्या आहे. १९८०-८१ या वर्षात प्रत्यक्षात आजीव आणि वार्षिक असे एकूण सुमारे २०० नवीन सभासद झाले. शाखासभांच्या विशेष प्रयत्नांनी सभासदांच्या संख्येत उल्लेखनीय भर पडली.

**साहित्य-पत्रिका :**

या वर्षात डॉ. आनंद यादव यांच्या संपादकत्वाने म. सा. पत्रिकेचे एकूण ३ अंक प्रसिद्ध झाले (१ जोडअंक) ग्रामीण-साहित्य विशेषांक हा या वर्षातील वैशिष्ट्यपूर्ण अंक.

**कै. वा. गो. आपटे संदर्भ-ग्रंथालय :**

वर्षारंभी ग्रंथालयातील ग्रंथसंख्या एकूण १९७२८ होती. चालू वर्षात नवीन खरेदी, पत्रिकेसाठी अभिप्रायार्थ आलेली आणि देणगीदाखल जमा झालेली मिळून एकूण

५०६ ग्रंथांची भर पडली. त्यामुळे मार्चअखेर एकूण ग्रंथसंख्या २०२३४ झाली. सर्वश्री प्रा. अ. म. जोशी, श्री. माधव नावडीकर, प्रा. दे. द. वाडेकर, श्री. या. रं. सुंठणकर, डॉ. स. गं. मालशे या सर्व ग्रंथप्रेमी देणगीदारांची परिषद ऋणी आहे. ग्रंथ घरी वाचावयास देण्याच्या योजनेचा सुमारे ४०० सभासद लाभ घेत आहेत. ग्रंथालयात बसून अभ्यास करणारांची संख्या दिवसेंदिवस वाढती आहे.

### संशोधन विभाग :

'भाषा व साहित्यसंशोधन' हा डॉ. वसंत स. जोशी यांच्या संपादकत्वाने सिद्ध झालेला ग्रथ सध्या आनंद मुद्रणालयात छापला जात आहे. जुलै ८१ अखेर ग्रंथ छापून प्रसिद्ध होईल.

### वाङ्मयेतिहास योजना :

वाङ्मयेतिहासाच्या संकल्पित खंडापैकी खंड २ चे संपादक डॉ. स. गं. मालशे यांजकडून खंडाची संपूर्ण मुद्रणप्रत हाती आली असून साहित्य संस्कृति मंडळाचे अनुदान मंजूर होताच मुद्रणास प्रारंभ होईल. ८१–८२ या आगामी वर्षात हा खंड प्रसिद्ध करण्याचा परिषदेचा मनोदय आहे. खंड ६ ( १९२० ते ८० ) चे संपादन प्रा. गो. म. कुलकर्णी आणि डॉ. व. दि. कुलकर्णी यांच्यावर सोपविण्यात आले आहे.

### स्मृतिदिन :

दरवर्षी ज्ञानकोशकार डॉ. केतकर यांच्या स्मृति-वंदनाने परिषदेच्या नव्या वर्षांच्या कार्यक्रमास आरंभ होतो. त्यानुसार १० एप्रिल रोजी सकाळी ज्ञानकोशकारांच्या कमला नेहरू उद्यानातील स्मारकास पुष्पांजली वाहण्यात आली. सायंकाळी डॉ मा. प. मंगुडकर यांच्या हस्ते कै. केतकरांच्या प्रतिमेस पुष्पहार समर्पण करून श्रद्धांजली वाहण्यात आली.

दि. १३ एप्रिल रोजी कै. बाळासाहेब पंतप्रतिनिधी यांच्या स्मृतिदिनानिमित्त परिषदेच्या सभागृहातील त्यांच्या प्रतिमेस पुष्पहार घालून श्रद्धांजली वाहण्यात आली.

दि. २१ जून रोजी कै. नाथमाधव यांच्या स्मृतिदिनानिमित्त श्री. सेतुमाधवराव पगडी यांचे 'मराठी ऐतिहासिक कादंबरी' या विषयावर व्याख्यानच झाले.

दि. २० जुलै रोजी कै. वा. म. जोशी यांच्या स्मृतिदिनानिमित्त न्या. चंद्रशेखर धर्माधिकारी यांचे 'अध्यात्म व समाजप्रबोधन' या विषयावर व्याख्यान झाले.

कै. बहिणाबाई चौधरी यांच्या जन्मशताब्दीचे हे वर्ष असल्यामुळे दि. १७ ऑगस्ट रोजी प्रा. म. वि. फाटक ( ठाणे ) यांचे व्याख्यान आयोजित केले होते. लोककवी

मनमोहन नातू या प्रसंगी अध्यक्ष होते.

हिन्दीतील सुप्रसिद्ध लेखक मुन्शी प्रेमचंद यांच्या जन्मशताब्दीनिमित्त दि. २७ ऑगस्ट रोजी प्रा. डॉ. श्री. दा. संगोराम यांचे ' प्रेमचंदांचे कथाविश्व ' या विषयावर व्याख्यान झाले. या प्रसंगी अध्यक्षस्थानी श्री. य. बा. उमराणीकर होते.

मराठी साहित्य संमेलनाचे माजी अध्यक्ष लो. माधव श्रीहरि अणे यांच्या जन्म-शताब्दीनिमित्त १६ सप्टेंबर रोजी परिषदेच्या सभागृहात विशेष सभा आयोजित केली होती. डॉ. चिं. ग. काशीकर यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या या सभेत कार्या-ध्यक्ष डॉ. वि. रा. करन्दीकर यांच्या प्रास्ताविकानंतर सर्वश्री वि. स. माडीवाले, प्राचार्य वसंत नूलकर, जी. एम. अणे, पु. शं. पतके, नी. शं. नवरे यांची कै. अणे यांचे व्यक्तित्व आणि कार्य विशद करणारी गौरवात्मक भाषणे झाली.

## श्रद्धांजली :

प्रा. श्री. के. क्षीरसागर, प्रा. अनंत काणेकर व श्री. पु. भा. भावे हे तीन माजी साहित्य संमेलनाध्यक्ष या कालावधीत काळाच्या पडद्याआड झाले. त्यांच्या दुःखद निधनाबद्दल परिषदेतर्फे शोकसभा आयोजित करून त्यांना श्रद्धांजली वाहण्यात आली.

दि. २१ मे रोजी कै. क्षीरसागर व कै. काणेकर यांच्या एकत्रित सभेत कार्याध्यक्ष डॉ. वि. रा. करन्दीकर यांच्या अध्यक्षतेखाली सर्वश्री भीमराव कुलकर्णी, गोपीनाथ तळवलकर, स. शि. भावे, चंद्रकुमार डांगे, ग. वि. पुरोहित यांनी श्रद्धांजली वाहिली.

दि. २२ ऑगस्ट रोजी भरत नाट्य-मंदिराच्या सहकार्याने कै. पु. भा. भावे यांना श्रद्धांजली अर्पण करण्यासाठी भरत नाट्य मंदिरात सभा आयोजित करण्यात आली होती. डॉ. वि. रा. करंदीकर यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या या सभेत सर्वश्री चित्तरंजन कोल्हटकर, भालबा केळकर, द. मा. मिरासदार, श्रीधर माडगूळकर, न. म. जोशी यांनी कै. भावे यांना श्रद्धांजली अर्पण केली.

सुप्रसिद्ध ग्रामीण कथा-कादंबरी-लेखक कै. र. वा. दिघे व कै. कमला फडके यांच्या दुःखद निधनाबद्दल झालेल्या ११ जुलै रोजीच्या सभेत सर्वश्री आनंद यादव, ग. ल. ठोकळ, सरोजिनी बाबर, ग. वा. बेहेरे, सौ. गीतांजली जोशी, अनुराधा वेलणकर यांची भाषणे झाली. अध्यक्षस्थानी प्रा. म. ना. अदवंत होते.

सह्याद्रि मासिकाचे माजी संपादक, ग्रंथसूचीकार व परिषदेच्या कार्यकारिणीचे माजी सदस्य कै. दि. वि. काळे तसेच कै. ग. वि. केतकर, दा. न. शिखरे या दिवंगत साहित्यिकांना कार्यवाहांनी पुष्पहार समर्पून श्रद्धांजली अर्पण केली.

## साहित्य-सांस्कृतिक कार्यक्रम :

दि. ६ जून प्रा. ग. वा. करन्दीकर ( पुसद ) यांचा शिवराज्याभिषेक दिनानिमित्त ' युगंधर योगीश्वर अवतार ' हा भावगीतात्मक काव्यवाचनाचा कार्यक्रम.

दि. २० जून आसाम साहित्य सभेचे अध्यक्ष डॉ. काशिनाथ देवशर्मा यांचे ‘साहित्य आणि सामाजिक बांधिलकी’ या विषयावर भाषण.

दि. १९ जुलै श्री. काकासाहेब अवचट यांचे “कुंडलीतील साहित्ययोग व साहित्यिकांच्या पत्रिकांचे विवरण” या विषयावर व्याख्यान.

दि. २१ जुलै प्राचार्य मा. प. मंगुडकर यांचे ‘महाराष्ट्रातील सामाजिक समतेची चळवळ’ या विषयावर व्याख्यान.

दि. ११ ऑगस्ट आमदार सौ. कुसुम अभ्यंकर यांचे ‘स्त्रीलेखिकांची भूमिका’ या विषयावर भाषण. श्री. श्री. ज. जोशी हे या प्रसंगी अध्यक्ष.

दि. २४ ऑगस्ट श्री. माधव मनोहर यांची प्रकट मुलाखत. श्री. ग. वा. बेहेरे, भीमराव कुलकर्णी, दि. वा. मोकाशी यांनी ती घेतली. डॉ. वि. रा. करन्दीकर अध्यक्षस्थानी होते.

दि. २५ ऑगस्ट कै. काकासाहेब खाडिलकर यांच्या साहित्यिक कृतींवर आधारित सौ. मंजुश्री खाडिलकर यांचे संगीत कीर्तन.

सुप्रसिद्ध लेखिका सौ. मालतीबाई बेडेकर यांच्या वयास ७५ वर्षे पूर्ण झाल्याबद्दल परिषदेने त्यांचा प्रकट सत्कार केला.

१ ऑक्टोबर रोजी झालेल्या या सत्कार समारंभात ‘मराठी साहित्यातील स्त्री-दर्शन’ या विषयावर परिसंवाद आयोजित केला होता. सर्वश्री भीमराव कुलकर्णी, गं. ना. जोगळेकर, श्री. ज. जोशी, ग. वा. बेहेरे आणि प्रा. सौ. अंजली सोमण यांनी मध्ययुगीन कालखंड ते स्वातंत्र्योत्तर कालखंड या काळातील मराठी साहित्यात प्रतिबिंबित झालेल्या स्त्रीचे दर्शन घडविले. सौ. मालतीबाई बेडेकर यांचे समयोचित अध्यक्षीय भाषणानंतर कार्याध्यक्ष डॉ. वि. रा. करन्दीकर यांनी परिषदेच्या वतीने त्यांचा सत्कार केला.

दि. २८ ऑगस्ट रोजी पुणे महानगरपालिकेच्या स्थायी समितीचे अध्यक्ष श्री. काका वडके यांनी परिषदेस भेट दिली व कार्यकर्त्यांसमवेत मनमोकळी चर्चा केली. परिषदेतर्फे त्यांचा सत्कार करण्यात आला.

दि. १० ऑक्टोबर ते दि. १९ ऑक्टोबर या अवधीत ‘शारदीय व्याख्यानामाले’त पुढील लेखकांची व्याख्याने झाली. (‘मी, माझे प्रेक्षक व माझे टीकाकार’ हा व्याख्यानाचा विषय होता) प्रा. भालबा केळकर, श्री. माधव कानिटकर, श्री दया पवार, डॉ. आनंद यादव, डॉ. भालचंद्र फडके, प्रा. गंगाधर गाडगीळ, डॉ. अनुराधा पोतदार, श्री. ए. वि. जोशी, श्री. शंकर पाटील. विजयादशमीस डॉ. न. का. घारपुऱ्यांच्या हस्ते ग्रंथपूजन व सरस्वतीपूजन होऊन व्याख्यानमालेचा समारोप झाला.

दि. २९ नोव्हेंबर हा कै. माधव जूलियन यांचा प्रतिवर्षी पाळला जाणारा स्मृति-दिन यंदा पुण्याच्या पूर्व भागात तो प्रथमच साजरा करण्यात आला. रास्ता पेठेतील

एथेला गार्डन अध्यापिका विद्यालयात या प्रसंगी एक कविसंमेलन आयोजित केले होते. लोककवी मनमोहन, सौ. संजीवनी मराठे, श्री. पद्मा गोळे, सुधाकर नेर्लेकर, रमण माळवदे, रागिणी वारसे, अनिल कांबळे, अरविंद पाटोळे, अंजली लिमकर, अशोक त्रिभुवन, सतीश इनामदार, मनोहर सोनवणे, जयंतकुमार त्रिभुवन, नंदकुमार पुरोहित इ. कवींनी कार्यक्रमात भाग घेतला. श्रीमती विजया पुणेकर आणि अरविंद पाटोळे यांचे या प्रसंगी सहकार्य लाभले.

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे नवे अध्यक्ष डॉ. सुरेन्द्र बारलिंगे यांनी दि. १० डिसेंबर रोजी परिषदेस भेट दिली. कार्यकर्त्यांसमवेत त्यांनी अनौपचारिक गप्पागोष्टी केल्या. नंतर परिषदेतर्फे त्यांचा हार्दिक सत्कार करण्यात आला.

अकोला येथील अ. भा. साहित्य संमेलनाचे अध्यक्ष श्री. गो. नी. दांडेकर यांचा दि २६ डिसेंबर रोजी राज्य शिक्षणशास्त्र संस्थेच्या सभागृहात प्रकट सत्कार आयोजित केला होता. अध्यक्षस्थानी श्री. ना. ग. गोरे होते. सर्वश्री द. मा. मिरासदार, भीमराव कुलकर्णी, डॉ. अंजली सोमण यांची या प्रसंगी समुचित भाषणे झाली. परिषदेने आयोजित केलेल्या दिवाळी अंक–स्पर्धेचे पारितोषिक वितरण श्री. दांडेकर यांच्या हस्ते या प्रसंगी झाले. ( तपशील पुढे पाहा )

कर्नाटक साहित्य अकॅडमीच्या वतीने मराठी भाषेतील बालसाहित्यविषयक कार्याचे अवलोकन करण्यासाठी श्री. आचार्य रसिक पुत्तुगे आणि श्री. युसूफ हे दोघे साहित्यिक आले होते. दि. १७ जानेवारी रोजी परिषदेस त्यांनी भेट दिली. या प्रसंगी श्री. ह. वि. मोटे, प्रा. वसंत मिरासदार, श्री माधव कानिटकर, डॉ. श्री. दा. संगोराम, श्री. ह. वि. दात्ये इत्यादी उपस्थित होते.

कै. विनायक कोंडदेव ओक यांचा स्मृतिदिन दि. २५ फेब्रुवारी रोजी मुक्तांगण ( सहकारनगर ) येथे साजरा करण्यात आला. या प्रसंगी बालसाहित्यिकांचा मेळावा आयोजित करण्यात आला होता. मुलांचे कथाकथन, कवितावाचन इ. कार्यक्रम झाले. आकाशवाणीचे श्री. नेमिनाथ उपाध्ये हे या प्रसंगी अध्यक्षस्थानी होते. श्री. सु. द. तांबे यांचे या प्रसंगी मनोभावे सहकार्य लाभले.

परिषदेचे भूतपूर्व कार्याध्यक्ष कै. नानासाहेब चापेकर यांच्या स्मृतिदिनानिमित्त ५ मार्च रोजी परिषदेत एक विशेष कार्यक्रम झाला. वै. आप्पासाहेब पंत यांचे या प्रसंगी व्याख्यान झाले. दुसरा विशेष असा की, कै. चापेकर यांचे स्मरणार्थ श्री. य. ना. चापेकर यांनी दिलेल्या देणगीतून श्री. प्रभाकर पाध्ये यांच्या ' मानव आणि मार्क्स ' या ग्रंथास रु. २५०/–चे पारितोषिक या प्रसंगी देण्यात आले. ग्रंथाचा परिचय डॉ. वि. रा. करन्दीकर यांनी करून दिला. श्री. रा. ता. फडणीस आणि प्रभाकर पाध्ये यांचीही या वेळी भाषणे झाली.

सौ. नयना आचार्य ( ठाणे ) यांचे दि. ९ मार्च रोजी परिषदेच्या सभागृहात

'आजच्या मराठी नाट्यवाङ्मयातील वासनाकांड' या विषयावर भाषण झाले. त्यांच्या भाषणानंतर प्रश्नोत्तरांचा कार्यक्रम झाला.

दि. १९ मार्च रोजी सुप्रसिद्ध साहित्यिक व परिषदेचे थोर कार्यकर्ते कै. श्री. म. माटे यांच्या स्मृतिदिनानिमित्त डॉ. म. पु. केन्दुरकर (ठाणे) यांचे 'साहित्यातून दिसणारे कै. माटे' या विषयावर भाषण झाले. (पुढील वर्षापासून श्री. दत्तप्रसन्न काटदरे यांनी दिलेल्या देणगीच्या व्याजातून कै. माटे व्याख्यानमालेचा शुभारंभ होणार आहे.)

परिषदेचे विश्वस्त आणि 'विश्वकोशा'चे प्रधान संपादक तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी ८१ व्या वर्षात पदार्पण केले. या आनंददायी प्रसंगानिमित्ताने टिळक स्मारक मंदिरात त्यांचा दि २२ मार्च रोजी प्रकट सत्कार करण्यात आला. सर्वश्री नानासाहेब गोरे, भीमराव कुलकर्णी, ग वा. बेहेरे यांनी तर्कतीर्थांची या वेळी प्रकट मुलाखत घेतली. डॉ. वि. रा. करन्दीकर यांनी सूत्रसंचालन केले.

पश्चिम विभागीय भाषाकेन्द्र (डेक्कन कॉलेज) पुणे येथील प्रशिक्षणार्थींनी परिषदेस दि. ३० मार्च रोजी भेट देऊन विविध भाषांतील कार्यक्रम सादर केले. श्री. मुकुंदराव किर्लोस्कर हे या प्रसंगी अध्यक्षस्थानी होते.

### मराठी साहित्य संमेलन :

अ. भा. मराठी साहित्य संमेलनाचे ५५ वे अधिवेशन अकोला (विदर्भ) येथे दि. १, २, ३ फेब्रुवारी १९८१ रोजी श्री. गो. नी. दांडेकर यांच्या अध्यक्षतेखाली भरले होते. केन्द्रीय माहिती व नभावाणीमंत्री नामदार श्री. वसंतराव साठे यांच्या हस्ते संमेलनाचे उद्घाटन झाले. खा. मधुसूदन वैराळे हे स्वागताध्यक्ष होते. कथाकथन, कविसंमेलन, परिसंवाद इ. साहित्यविषयक कार्यक्रमात परिषदेच्या कार्यकारी मंडळातील सर्वश्री ग. वा. बेहेरे, राम शेवाळकर, आनंद यादव, गो. म. कुलकर्णी, वसंत सावंत इत्यादींनी भाग घेतला. शासकीय ग्रंथ पारितोषिकाबाबत विषयनियामक समितीत शासनाच्या निषेधाची जी वादळी चर्चा झाली तीत परिषदेच्या कार्यकर्त्यांनी आपला तीव्र असंतोष व्यक्त केला.

### ग्रंथव्यवहार परिषद :

ग्रंथव्यवहार परिषदेचे दुसरे अधिवेशन ठाणे येथे म. सा. प. च्या ठाणे जिल्हा शाखेतर्फे दि. २२ व २३ नोव्हेंबर रोजी ठाणे येथील शिवसमर्थ विद्यालयाच्या सभागृहात पार पडले. मुख्य अधिवेशन दि. २३ नोव्हेंबर रोजी होते. दिनांक २२ नोव्हेंबर रोजी परस्थ व स्थानिक साहित्यिकांचे एक छोटेसे संमेलन मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या सहकार्याने भरले. या संमेलनाचे एकूण चार भाग होते. कविसंमेलन,

कथापूर्ती व कथाकथन, साहित्यिक गप्पागोष्टी व अत्रे वन्समोअर अर्थात हास्यकल्लोळ. कविसंमेलनाचे संचालन कवी पी. सावळाराम यांनी केले. सर्वश्री राम शेवाळकर, दत्ता हलसगीकर, निरंजन उजगरे, म. पां. भावे, वसंत दीक्षित, अशोक बागवे, वसंत सावंत, ह. श्री. शेणोलीकर, सुनंदा भोसेकर, दिलीप मालवणकर, शुक्राचार्य गायकवाड, ग. वा. बेहेरे, विभावरी अंतरकर व कविवर्य पी. सावळाराम, या चौदा कवींनी कविसंमेलनात रंग भरला.

कार्यक्रमाच्या दुसऱ्या कथापूर्ती व कथाकथन कार्यक्रमाची सूत्रे श्री. चिं. शं. जोशी यांनी स्वीकारली होती. श्री. जोशी यांनी कथेची सुरुवात केली व त्यानंतर क्रमाने श्री. ग. वा. बेहेरे, सौ. नयना आचार्य, सौ. मंदाकिनी भारद्वाज, प्रा. वसंत मिरासदार, डॉ. र. म. शेजवलकर, श्री. प्रभाकर अत्रे यांनी कथेचे सूत्र पकडून कथा फुलवीत दुसऱ्याचे हाती दिली. या अभिनव उपक्रमास श्रोत्यांनी मनापासून दाद दिली.

तिसरा कार्यक्रम साहित्यिक गप्पागोष्टींचा. श्री. प्रकाश गीध यांनी या कार्यक्रमाचे संचालन केले. त्यात सर्वश्री ग. वा. बेहेरे, राम शेवाळकर, न. म. जोशी, यांना प्रकाश गीध, नरेन्द्र वल्लाळ, श्रीमती पारसनीस यांनी विविध प्रश्न विचारले.

शेवटचा कार्यक्रम श्री. सदानंद जोशी यांचा 'आचार्य अत्रे वन्समोअर' हा झाला.

ग्रंथव्यवहार परिषदेच्या मुख्य कार्यक्रमाची सुरुवात दि. २३ नोव्हेंबर रोजी सकाळी झाली. प्रथम जिल्हा शाखेचे अध्यक्ष प्रा. म. वि. फाटक यांनी नगराध्यक्ष व स्वागताध्यक्ष श्री. सतीश प्रधान यांचा परिचय करून दिला. श्री. सतीश प्रधान— स्वागताध्यक्ष यांनी ठाण्याच्या ऐतिहासिक, सांस्कृतिक व औद्योगिक विशेषांचा परिचय करून दिला. परिषदेचे कार्याध्यक्ष डॉ. करन्दीकर यांनी ग्रंथव्यवहार परिषदेचे स्वरूप विशद करून कार्यक्रमाचे औपचारिक रीत्या उद्घाटन केले.

'दर्जेदार साहित्य की लोकप्रिय साहित्य' या चर्चासत्राचे अध्यक्ष प्रा. माधव मनोहर होते. श्री. द. दा. काळे यांनी संचालन केले. या चर्चासत्रात सर्वश्री अशोक चिटणीस, बाळ सामंत, प्रा. न. म. जोशी, प्रा. व. मा. मिरासदार, सौ. नयना आचार्य यांनी भाग घेतला.

दुसऱ्या सत्राचा विषय होता 'ग्रंथव्यवहारातील वितरण व विक्री व्यवस्थेची समस्या'. श्री. अनंतराव कुलकर्णी (कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे) हे अध्यक्षस्थानी होते. संयोजन श्री. प्रभाकर अत्रे यांनी केले. या चर्चासत्रात सर्वश्री श्याम कोपर्डेकर, पां. ना. कुमठा, शांतिलाल भंडारी, दिनकर गांगल, ग. वा. बेहेरे, प्रा. रमेश पानसे यांनी भाग घेतला.

'साहित्य जीवनावश्यक आहे काय' या तिसऱ्या चर्चासत्राचे अध्यक्षस्थानी श्री. ग. वा. बेहेरे होते. सर्वश्री राम शेवाळकर, रमेश पानसे, ह. श्री. शेणोलीकर, अनंतराव कुलकर्णी, वसंत सावंत, सौ. आशा साठे, श्याम फडके, यांनी या चर्चा-

सत्रात भाग घेऊन चर्चा रंगविली.

यानंतर परिषदेचा समारोप म. सा. परिषदेचे कार्याध्यक्ष डॉ. वि. रा. करन्दीकर यांनी केला. कार्यवाह श्री. म. श्री. दीक्षित यांनी परिषदेतर्फे व प्रा. म. वि. फाटक यांनी जिल्हा शाखेतर्फे सर्वांचे आभार मानले.

## अभीष्टचिंतन :

कवी प्रा. ग. ह. पाटील यांनी ७५ व्या वर्षात पदार्पण केल्याबद्दल, नाट्य-संमेलनाचे माजी अध्यक्ष प्रा. भालबा केळकर यांच्या षष्ट्यब्दिपूर्तीनिमित्त परिषदे-तर्फे त्यांच्या घरी जाऊन कार्यवाह श्री. म. श्री. दीक्षित व प्रा. न. म. जोशी यांनी अभीष्टचिंतन केले.

## दिवाळी अंक स्पर्धा :

१९८० मध्ये प्रसिद्ध झालेल्या दिवाळी अंकांतील सर्वोत्कृष्ट तीन दिवाळी अंकांना प्रत्येकी रु. १०१/-ची तीन पारितोषिके परिषदेच्या ग्रंथालय समितीतर्फे देण्यात आली. ही पारितोषिके ' मासिक मनोरंजन 'कार कै. का. र. मित्र, ' विविधज्ञान-विस्तार 'कर्ते कै. रा. र. मोरमकर, आणि ' किर्लोस्कर ' मासिकाचे संपादक कै. शं. वा. किर्लोस्कर यांच्या नावे देण्यात आली. आलेल्या अंकांमधून खालीलप्रमाणे ही पारितोषिके देण्यात आली.

**दिनांक :** संपादक श्री. निखिल वागळे-मुंबई ( मासिक मनोरंजनकर्ते कै. का. र. मित्र यांचे स्मृत्यर्थ )

**राजस :** संपादक प्रा. विलास एकबोटे-पुणे ( विविधज्ञानविस्तारकर्ते कै. रा. सा. रा. र. मोरमकर यांचे स्मृत्यर्थ )

**ललित :** संपादक श्री. केशव कोठावळे-मुंबई ( किर्लोस्कर मासिकाचे संपादक कै. शं. वा. किर्लोस्कर यांचे स्मृत्यर्थ )

याशिवाय संयोजनपूर्वक संपादित अशा पुढील दोन दिवाळी अंकांना प्रत्येकी ५१/-रुपयांची विशेष गुणवत्ता पारितोषिके समितीने दिली.

**अनुष्टुभ :** संपादक प्रा. पुरुषोत्तम पाटील, धुळे.

**अस्मितादर्श :** संपादक प्रा. गंगाधर पानतावणे, औरंगाबाद.

## वार्षिक सभा :

परिषदेची वार्षिक साधारण सभा रविवार दि. २९ जून रोजी सायं. ५ वाजता पुणे येथे प्रा. वसंत कानेटकर यांच्या अध्यक्षतेखाली भरली. सभेत पुढीलप्रमाणे कामकाज झाले. दिवंगत अध्यक्षांना श्रद्धांजली; संस्थेचे ७९-८० चे कार्यवृत्त

जमाखर्च आणि १९८०–८१ चा अर्थसंकल्प यांना मान्यता; पुणे विद्यापीठाच्या वाणिज्य विद्याशाखेच्या काही परीक्षांच्या अभ्यासक्रमातून मराठी व अन्य भाषांचा अभ्यास वगळण्यात आल्याबद्दल खेद व्यक्त करणारा ठराव; महामंडळ घटनेत दुरुस्त्या सुचविण्यासाठी समितीची नियुक्ती; इंदूर, बडोदे नभोवाणी केन्द्रांवर मराठी कार्यक्रमास स्थान दिल्याबद्दल अभिनंदन इत्यादी.

### काही देणग्या :

श्री. विजय फडणीस पुणे व सौ. सुप्रिया सहस्रबुद्धे यांनी कै. विश्वनाथ जनार्दन ऊर्फ पिलाजीराव फडणीस (इचलकरंजी) यांच्या स्मृत्यर्थ रु. ३००० ची देणगी परिषदेकडे दिली असून या देणगीच्या व्याजातून दरवर्षी शाखेच्या ठिकाणी एखादे कविसंमेलन, व्याख्यान अथवा परिसंवाद आयोजित करण्यात येणार आहे.

अभिनव मराठी ज्ञानकोशाचे संपादक श्री. ग. रं. भिडे (कोल्हापूर) यांनी ज्ञानकोशकार कै. श्रीधर व्यंकटेश केतकर यांचे स्मरणार्थ दरवर्षीच्या कार्यक्रमासाठी रु. १५०० ची देणगी परिषदेकडे सुपूर्त केली.

### मराठी साहित्य महामंडळ :

वृत्तान्तकालात मराठी साहित्य महामंडळाच्या एकूण दोन सभा अकोला येथे झाल्या. परिषदेचे महामंडळावरील प्रतिनिधी डॉ. वि. रा. करंदीकर, प्रा. ह. श्री. शेणोलीकर व प्रा. म. वि. फाटक यांनी सभेच्या कामकाजात भाग घेतला.

### ग्रंथपारितोषिके :

काही देणगीदारांनी दिलेल्या ठेवरूप निधीच्या व्याजातून परिषदेतर्फे प्रतिवर्षी विविध ग्रंथ पारितोषिके दिली जातात. या वर्षी १९८० मध्ये प्रसिद्ध झालेल्या पुढील ग्रंथांना पारितोषिके देण्यात आली.

**कविता :** 'बाभूळवन' (हिमांशु कुलकर्णी) रु. १०० चे कै. ह. स. गोखले यांचे स्मृत्यर्थ.

**उत्कृष्ट प्रकाशन :** 'आर्य' कादंबरी (विश्वकर्मा साहित्यालय) रु. १०० चे कै. अ. स. गोखले यांचे स्मृत्यर्थ.

**कादंबरी :** 'आर्य' (वसंत पटवर्धन) रु. १०० चे कै. ह. ना. आपटे स्मृत्यर्थ.

**ललितेतर ग्रंथ :** (१) साहित्यातील अधोरेखिते (म. द. हातकणंगलेकर) रु. २५०/ कै. शि. म. परांजपे यांचे स्मरणार्थ.

(२) मानव आणि मार्क्स (प्रभाकर पाध्ये) रु. २५०/– कै. ना. गो. चापेकर यांचे स्मरणार्थ.

अनुक्रमणिका

( ३ ) ज्ञानेश्वरी : स्वरूप, तत्त्वज्ञान आणि काव्य ( म. वा. धोंड ) रु. १५० /– कै. विश्वनाथ-पार्वती गोखले पारितोषिक.

संपादित ग्रंथ : साहित्यिक खांडेकर ( एस. एस. भोसले ) रु. १००/– चे कै. गिरिजा-गंगाधर जांभेकर पारितोषिक.

**शाखा-सभा कार्यवृत्तान्त :**

सोलापूर, कोल्हापूर, सांगली, सातारा, अहमदनगर, नेवासे, धुळे, जळगाव, ठाणे, वाई या दहा ठिकाणी परिषदेच्या शाखा आणि इतरत्र सतरा संलग्नसंस्था साहित्य-विषयक कार्य करीत असतात. शाखांकडून आलेल्या कार्याचा ठळक वृत्तान्त येणेप्रमाणे—

**वाई :**

शाखेचे एक संस्थापक-सदस्य प्रा. शिवाजीराव चव्हाण यांना शिवाजी विद्यापीठाकडून पीएच. डी. पदवी प्राप्त झाल्याबद्दल त्यांचा व त्यांचे मार्गदर्शक डॉ. वसंत स. जोशी यांचा सत्कार शाखेचे कार्यवाह डॉ. डी. टी. भोसले यांच्या अध्यक्षतेखाली दि. २५ जुलै रोजी झाला. डॉ. शिवाजीराव चव्हाण यांनी ' मराठी आध्यात्मिक शाहिरी परंपरा व वाङ्मय ' या आपल्या प्रबंधाचा परिचय या प्रसंगी करून दिला.

दि. २४ ऑगस्टला हिंदी साहित्यिक मुन्शी प्रेमचंद : जन्मशताब्दीनिमित्त डॉ. व्यंकटेश व्ही. कोटयागे यांचे ' प्रेमचंदांचे कथा-वाङ्मय ' या विषयावर व्याख्यान.

नवीन कार्यकारी मंडळाची सभा दि. २४ ऑगस्ट रोजी कार्याध्यक्ष डॉ. व. स. जोशी यांच्या अध्यक्षतेखाली होऊन पदाधिकारी व स्वीकृत सदस्यांची निवड करण्यात आली.

दि. २० सप्टेंबर रोजी प्रा. म. ना. अदवंत यांचे ' आजची मराठी संगीत रंगभूमी ' या विषयावर व्याख्यान.

दि. २२ ऑक्टोबर रोजी आदर्श शिक्षकाचा पुरस्कार लाभलेले श्री. डी. एल. पाटील व प्राचार्य श्री. एस. बी. पाटील यांचा सत्कार.

दि. २८ नोव्हेंबर रोजी म. फुले पुण्यतिथीनिमित्त डॉ. शिवाजीराव चव्हाण यांचे ' म. फुले आणि शेतकरी चळवळ ' या विषयावर व्याख्यान.

डॉ. व. स. जोशी यांनी संपादित केलेल्या ' मऱ्हाटी संस्कृती : काही समस्या ' या ग्रंथाच्या दुसऱ्या आवृत्तीचा प्रकाशन समारंभ श्री. यदुनाथ थत्ते यांच्या हस्ते.

शाखेच्या भित्तिपत्रकाचा अंक प्रकाशित झाला.

दि. १८ जानेवारीला शाखेचे सहकार्यवाह प्रा. विजयकुमार फरांदे यांचे ' वाईतील नियतकालिके ' या विषयावर व्याख्यान.

अनुक्रमणिका

म. सा. प. चे आजीव सभासद तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी ८१ व्या वर्षात पदार्पण केल्याबद्दल ११ फेब्रुवारीला नागरिकांतर्फे झालेल्या सत्कारात शाखेने भाग घेतला व पुष्पहार घालून त्यांचा सत्कार केला.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर जयंतीनिमित्त श्री. सतीश कुलकर्णी यांचे 'डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे साहित्यविषयक विचार' या विषयावर व्याख्यान झाले.

## २ ठाणे :

शाखेच्या पदाधिकाऱ्यांच्या नव्याने निवडणुका होऊन पुढील पदाधिकाऱ्यांची निवड झाली; अध्यक्ष प्रा. म. वि. फाटक; उपाध्यक्ष : श्री. पी. सावळाराम; कार्याध्यक्ष : श्री. चिं. शं. जोशी; कोषाध्यक्ष : श्री. पां. के. दातार; कार्यवाह : सौ. नयना आचार्य, श्री. मधुकर सुतार.

शाखेचा प्रथम वर्धापनदिन १० जूनला म. ग्रंथसंग्रहालयाच्या सहकार्याने पार पडला. म. सा. प. चे उपाध्यक्ष प्रा. म. ना. अदवंत हे प्रमुख पाहुणे होते. श्री. चिं. शं. जोशी यांच्या 'लॉलीपॉप' या नव्या कादंबरीचा परिचय या वेळी करून देण्यात आला. प्रा म. वि. फाटक हे अध्यक्षस्थानी होते. सर्वश्री पी. साळाराम, स. वि. कुलकर्णी, नरेन्द्र बल्लाळ व अशोक चिटणीस यांची कादंबरीसंबंधी भाषणे झाली. सौ. नयना आचार्य यांनी आभार मानले.

"स्त्री : लेखिका-एक चिंता व चिंतन" या विषयावर दि. २० जुलै रोजी चर्चात्मक कार्यक्रम झाला. प्रा. म. वि. फाटक यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या या कार्यक्रमात सौ. नयना आचार्य, सौ. आशा साठे, श्री. प्रकाश गीध यांनी भाग घेतला. या प्रसंगी ग्रंथलेखक डॉ. भालचंद्र फडके उपस्थित होते. त्यांनीही आपली भूमिका मांडली.

दि. २१ ऑगस्ट रोजी श्री. पी. सावळाराम यांच्या अध्यक्षतेखाली कै. बहिणाबाई चौधरी यांची जन्मशताब्दी साजरी झाली. प्रा. सौ. ज्योतिका ओझरकर व प्रा. मंगला नांदुर्डीकर यांची भाषणे व श्री. अनिरुद्ध जोशी यांचे कै. बहिणाबाईंच्या कवितांचे गायन असा कार्यक्रम झाला. संचालन प्रा. म. वि. फाटक व आभार-प्रदर्शन श्री. स. वि. कुलकर्णी यांनी केले.

## ३ सोलापूर :

३१।८।८० मोहोळ येथे शाखेच्या वतीने कथाकथन. शाखाध्यक्षा प्रा. खाडिल-करांचे मार्गदर्शन. कु. क्रांती छत्रपती, शोभा कुरनूरकर, प्रा. अनिल फडके, सारंगमामा कुलकर्णी यांचे कथाकथन कार्याध्यक्ष. श्री. छत्रपती रा. व्यं. यांचे शाखा स्थापण्याविषयी विवेचन.

पंढरपूर येथे दि. २८ सप्टेंबर ८० रोजी कार्याध्यक्ष श्री. रा. व्यं. छत्रपती यांचे

मार्गदर्शनाखाली कथाकथन. प्रा. वदक, प्रा. पाटील आदींचे सहकार्य व सहभाग.

दि. १४।१०।८० रोजी पुस्तक परीक्षण. 'वलुतं' वर अनिल फडके, 'माणसं'-वर श्री. छत्रपति रा. व्यं. आणि 'कॅकटस फ्लॉवर' वर दत्ता हलसगीकर यांची रसग्रहणात्मक भाषणे. प्रास्ताविक व आभार श्री. नागेश.

'सांगोला' शाखा स्थापना. या प्रसंगी प्रा. खाडिलकर, श्री. दत्ता हलसगीकर; श्री. छत्रपती यांची उपस्थिती व मार्गदर्शन. काव्यवाचन प्रा. प्रमिला देशमुख, प्रा. वांगीकर, श्री. टिंगरे आदींचा सहभाग.

दि. २५।१२।८० रोजी 'बंधमुक्त' ही स्थानिक हौशी कलावंतांची एकांकिका. डॉ. कुलकर्णी व त्यांचे सहकारी प्रा. सौ. शकुंतला पाटील, प्रा. सौ. सिंधूबाई कुलकर्णी यांचे सहकार्य. अध्यक्षांचे मार्गदर्शन. प्रा. शेख यांनी आभार मानले. प्रास्ताविक श्री. नागेश यांचे.

दि. ३ व ४ जानेवारी ८१ ला बहिःशाल शिक्षण मंडळ शिवाजी विद्यापीठ व म. सा. प. शाखा सोलापूरच्या वतीने संयुक्त कार्यक्रम. 'स्त्री' मासिकाचा सहभाग. विद्या बाळ व ह. मो. मराठे यांचे व्याख्यान व मार्गदर्शन. 'कुटुंबव्यवस्था कालची व आजची' या विषयावर डॉ. रा. ल. जोशी, प्रा. शकुंतला पाटील, प्रा. सौ. नलिनी औरंगाबादकर, प्रा. सर्वोत्तम कु. नासरकरांचे व्याख्यान, प्रा. गणपुले, प्रा. नसिम पठाण, प्रा. सौ. वसुमती कुलकर्णी आदींचा सहभाग. प्रास्ताविक प्रा. गणपुले. संचालन श्री. दत्ता हलसगीकर. आभार श्री. छत्रपति.

'कवि कुंजविहारी' काव्यस्पर्धा १९८१. या स्पर्धा ८।२।८१ रोजी घेण्यात आल्या. पद्मश्री पंडिता सुमती बेन शहा या अध्यक्षा. प्रा. जेऊरकर, सौ. राऊत, प्रा. राजेंद्र दास हे परीक्षक. सुमारे २५ स्पर्धकांनी भाग घेतला. प्रास्ताविक प्रा. शेख आणि आभार श्री. छत्रपती. अध्यक्षांनी स्पर्धेसाठी रु. १००/- ची देणगी दिली. रोख व काव्यसंग्रहाच्या रूपाने स्पर्धकांस बक्षिसे दिली.

स्वर्गीय बहिणाबाईंची गाणी गायनाचा कार्यक्रम शाखाध्यक्षा प्रा. सौ. शकुंतला पाटील, प्रा. सौ. सिंधूताई कुलकर्णी व त्यांच्या सहकारी भगिनी आणि विद्यार्थिनींनी सादर केला. प्रास्ताविक लता पाटील यांनी व आभार शाखाध्यक्षांनी मानले.

दि. २१।३।८१ रोजी 'रामायणाचा नायक : लक्ष्मण' या विषयावर प्राचार्य राम शेवाळकर यांचे व्याख्यान झाले. या वेळी साहित्य परिषदेचे कार्यवाह श्री. म. श्री. दीक्षित यांनी उपस्थित राहून शाखेचे अभिनंदन केले. प्रास्ताविक श्री. रा. व्यं. छत्रपती, आभार श्री. प्रा. शेख. नागेश सुखसे यांनी या प्रसंगाला साजेल असे लक्ष्मणाचे सुंदर चित्र काढले होते. याच वेळी काव्यवाचनाचा बहारदार कार्यक्रम झाला.

श्री. नागेश कन्ना, श्री. आनंद बदामीकर, श्री. प्रभाकर दळवी आणि 'बाभूळवन' या काव्यसंग्रहास म. सा. प. पुणे यांचेकडून ह. स. गोखले पारितोषिक मिळविलेले

कवी व गझलकार श्री. हिमांशू कुलकर्णी आदी मान्यवर व्यक्तींचा सत्कार व गौरव करण्यात आला.

शाखेचे आजीव सदस्य स्व. पं. मा. कामतकरांना श्रद्धांजली वाहण्यात आली. म. सा. प. तर्फे श्री. छत्रपती व दत्ता हलसगीकर, श्री. सारंगमामा कुलकर्णी, प्रा. विलास पाटील व शाखाध्यक्षा उपस्थित होत्या.

मा. सुशीलकुमार शिंदे यांनी बार्शी साहित्य संमेलनात जाहीर केल्याप्रमाणे शाखेस मध्यवर्ती संस्था म्हणून रु. २५००० चा चेक अर्पण करण्याचा समारंभ प्रा. विलास पाटील यांचे निवासस्थानी झाला. पन्नालालजी सुराणा, दिनूभाऊ सुलाखे, दत्ता हलसगीकर, श्री. छत्रपती या वेळी उपस्थित होते.

नाट्य आराधनेचे श्री. शिरीष देखणे यांची 'नारायण' ही विनोदी एकांकिका शाखेच्या वतीने सादर करण्यात आली.

**४ अहमदनगर :**

(१) ९–१–८० कविवर्य बा. भ. बोरकर यांचे काव्यवाचन.

(२) १०–२–८० डॉ. अ. वा. वर्टी यांच्यासमवेत साहित्यिक गप्पांचा कार्यक्रम.

(३) २०–२–८० अशोकजी परांजपे–लोककलेवर भाषण व गप्पा.

(४) २५–२–८० रवींद्र पिंगे यांचा सत्कार.

(५) २८–२–८० कवी पुरुषोत्तम पाटील (संपा. अनुष्टुभ) यांचे काव्यावर व्याख्यान व नगरच्या कवयित्री सौ. वत्सलाबाई पंडित यांचा 'मावळतीचे रंग' या काव्यसंग्रहाचे प्रकाशन.

(६) १–२ मार्च ८० कोपरगाव जिल्हा साहित्य संमेलनात नगर शाखेचा सहभाग. कविसंमेलनाचे अध्यक्ष प्रा. वसंत दीक्षित, ग्रंथप्रदर्शनाचे उद्घाटन म. सा. प. अध्यक्ष द. वा. डावरे यांच्या हस्ते.

(७) १८ मार्च ८० नेवासे–म. सा. प. शाखेचे उद्घाटन झाले. कविसंमेलन अध्यक्ष–वसंत दीक्षित, नगर जिल्ह्यातील साहित्यिक चळवळीचा आढावा श्री. द. वा. डावरे यांनी घेतला.

(८) १९–१–८१ कवयित्री वंदना विटणकर यांचे काव्यवाचन व साहित्यिक गप्पा.

(९) ११–१–८१ सुप्रसिद्ध कथालेखक श्री. व. पु. काळे यांच्या कथाकथनाचा सशुल्क कार्यक्रम झाला. खर्च वजा जाता म. सा. प.ला सुमारे ४०० रुपये उत्पन्न जमा झाले.

(१०) २२–२–८१ अरुणा ढेरे यांच्या उपस्थितीत जिल्हा कविसंमेलन भरगच्च गर्दीत पार पडले.

अनुक्रमणिका

(११) श्रवणबेळगोळ येथील गोमटेश्वराच्या मूर्तीला एक हजार वर्षे झाल्याच्या पार्श्वभूमीवर–मराठीचे पहिले लिखित वाक्य तिथे असल्याने–मराठी भाषेलाही हजार वर्षे झाली या निमित्ताने–मराठी भाषा-सहस्त्राब्द महोत्सव शुभारंभानिमित्त–प्रा. डॉ. भालचंद्र फडके, मराठी विभाग, पुणे विद्यापीठ यांचे व्याख्यान झाले. महाराष्ट्रातला हा पहिलाच कार्यक्रम होता. या कार्यक्रमाला–प्रा. रमेश वरखेडे, प्रा. य. प्र. कुलकर्णी, प्रा. सु. का. जोशी, प्रा. ना. स. फरांदे, डॉ. बांदिवडेकर, डॉ. दिवाकर आदी अनेक प्राध्यापक व नागरिक उपस्थित होते.

(१२) ग. वा. बेहेरे–संपादक 'सोबत' यांची मुलाखत व साहित्यिक गप्पा.

(१३) ठाणे येथील ग्रंथव्यवहार परिषदेला नगरशाखेचे अध्यक्ष, कोषाध्यक्ष, चिटणीस उपस्थित होते.

(१४) अकोला मराठी साहित्य संमेलनाला नगर शाखेचे सभासद व पदाधिकारी मिळून दहाजण उपस्थित होते.

या वर्षी श्री. धों. ग. वडझीरकर, सौ. तारा माचवे, कु. कुसुम झवर, प्रा. सदानंद देहूकर म. सा. प. चे आजीव सभासद झाले. त्याचप्रमाणे महाराष्ट्र राज्य साहित्य–संस्कृती मंडळ यांच्या 'नव-लेखक अनुदान योजने'त नगर जिल्ह्यातील व शहरातील ज्या कवींना व कथालेखकांना अनुदान मिळून, ज्यांची पुस्तके प्रकाशित झाली त्यांचा म. सा. प. ने सत्कार केला.

## ५ धुळे :

(१) कै. बहिणाबाई चौधरी जन्मशताब्दीनिमित्त प्रा. कुसुमाकर शिंपी यांचे 'बहिणाबाईंची कविता' या विषयावर व्याख्यान. प्रा. जे. जी. खैरनार, सौ. सुषमा गरुड, प्रा. उपासनी इ. चा चर्चेत सहभाग.

(२) दिवंगत साहित्यिक कै. पु. भा. भावे, प्रा. ना. सी. फडके, कमला फडके, श्री. के. क्षीरसागर, दि. वि. काळे, माधव आचवल, आप्पा पेंडसे यांना श्रद्धांजली अर्पण करण्यात आली. पु. भा. भावे–एक राष्ट्रवादी साहित्यिक–प्रा. कुसुमाकर शिंपी यांचे भाषण, पत्रकार आप्पा पेंडसे—प्रा. जे. जी. खैरनार यांचे भाषण, थोर लेखिका कै. कमला फडके—सौ. सुषमा गरुड यांचे भाषण.

(३) दि. २।१०।८० रोजी श्री. ल. नी. छापेकर यांच्या अध्यक्षतेखाली स्थानिक कवींचे एक संमेलन घेण्यात आले याच संमेलनात म. सा. प. चे सदस्य श्री. नागेश मोगलाईकर यांचा एकसष्टीनिमित्त सत्कार करण्यात आला.

(४) कै. ग. दि. माडगुळकर स्मृतिदिनानिमित्त रसिकांसाठी गीतरामायणाचा कार्यक्रम सादर करण्यात आला.

गायक कलावंत—प्रा. सौ. शैलजा वाघमारे, संगीत विशारद सौ. पाटणकर.

(५) ३१।३।८१ रोजी धुळे येथे झालेल्या बहुभाषिक कविसंमेलनात कार्याध्यक्ष प्रा. कुसुमाकर शिंपी यांचा शाखेचे एक कार्यकर्ते म्हणून सहभाग.

**६ नेवासे :**

(१) ज्ञानेश्वर महाविद्यालयाचे अध्यक्ष श्री. यशवंतराव गडाख यांचा दि. २५।१०।८० रोजी त्यांच्या "जागतिक दौऱ्यानिमित्त" म. साहित्य परिषद नेवासे शाखेतर्फे सत्कार करण्यात आला.

(२) प्रसिद्ध कथालेखक श्री. दि. बा. मोकाशी यांच्याशी दि. २७।१०।८१ रोजी 'साहित्यिक गप्पां'चा कार्यक्रम झाला.

(३) श्री. पुंडलिक शिवराम मापारी यांच्या अभंगावली या पुस्तकाचा प्रकाशन समारंभानिमित्त म. सा. प. नेवासे शाखेचे अध्यक्ष प्राचार्य डॉ. श्री. वि. फडवेकर यांनी त्यांचा सत्कार केला. (दि. ५।१२।८०)

(४) प्रा. अशोक एरंडे यांचे दि. २।१।८१ रोजी 'सत्यशोधक मुकुंदराव पाटील' या विषयावर व्याख्यान झाले.

(५) प्रा. अशोक शिंदे यांचे ९।२।८१ रोजी 'दलित साहित्य' या विषयावर व्याख्यान झाले.

**७ जळगाव :**

(१) श्रद्धांजली : शाखासभेचे माजी अध्यक्ष, कवी व बालसाहित्यिक श्री. के. नारखेडे यांच्या निधनानिमित्त शाखा-सभेने खास सभा योजून त्यांना श्रद्धांजली अर्पण केली.

(२) म. सा. प. पुणे चे उपाध्यक्ष प्रा. म. ना. अदवंत यांच्याशी गप्पागोष्टींचा कार्यक्रम.

(३) २३।१०।८० रोजी श्री. ना. धों महानोर यांच्याशी 'साहित्यिक गप्पा-गोष्टींचा' कार्यक्रम.

(४) महाराष्ट्र शासनाच्या एकनाथांच्या 'भावार्थ रामायण' या प्रकल्पाचे चिटणीस संत साहित्याचे अभ्यासक व संशोधक श्री. न. शे. पोहनेरकर यांचे 'जुन्या मराठी साहित्यातील प्रेरणा' या विषयावर विवेचक व्याख्यान झाले.

(५) दिनांक ७।२।८० रोजी कै. भा. रा. तांबे स्मृतिदिनानिमित्त जळगाव जिल्ह्यातील कवींचे संमेलन आयोजित केले होते. या कविसंमेलनात एकूण ५६ कवींनी भाग घेतला. अध्यक्षस्थानी जिल्ह्यातील सातत्याने लिखाण करणारे कवी श्री धों वे. जोगी गुरुजी होते. या कार्यक्रमाचे नियोजन चिटणीस श्री. स. सो सुतार यांनी केले.

(६) महाराष्ट्र साहित्य व संस्कृती मंडळाच्या नवलेखन योजनेखाली अनुदान-

प्राप्त 'देवाघरचा न्याय'—श्री. अरुण सुका पाटील यांच्या कथासंग्रहाचे प्रकाशन दिनांक २४।३।८१ रोजी झाले. अध्यक्षस्थानी श्री. ल नी. छापेकर होते. प्रमुख पाहुणे म्हणून जळगाव येथील सुप्रसिद्ध सर्जन डॉ. जी डी. बेंडाळे हे होते. या कार्यक्रमाचे संयोजन प्रा. प्र. श्रा. चौधरी यांनी केले. चिटणीसद्वय श्री. वि. भा. नेमाडे आणि नीळकंठ महाजन यांनी संचालन व आभार मानले.

### संलग्न संस्था :

द. रत्नागिरी संघ (सावंतवाडी) या संस्थेचे कार्य यंदा विशेष उल्लेखनीय झाले. कथाकार मेळावा, पाच प्रकाशने, 'अबोली' स्मरणिका, कवि-संमेलन, कथावाचन, श्री. मधु मंगेश कर्णिक आणि प्रा. न. म. जोशी यांच्याबरोबर गप्पागोष्टी असे विविध कार्यक्रम संस्थेतर्फे झाले. अध्यक्ष डॉ. वसंत सावंत, कार्याध्यक्ष प्रा. ह. व्यं. देशपांडे, कार्यवाह हरिहर आठलेकर यांचे या कामी मार्गदर्शन लाभले.

### आर्थिक स्थिती :

गतवर्षीचा (१९८०–८१) अर्थसंकल्प ३०,००० रु. तुटीचा होता. प्रत्यक्षात ही तूट रु. ९०१–२५ नी वाढली. सेवकवर्गास वेतनवाढ, विजेचा वाढता खर्च, प्रवासभाड्यातील वाढ, कागद-छपाई व टपालाचे वाढते दर, आणि अमृतमहोत्सवानिमित्त इमारतीस दहा वर्षांनी द्यावा लागलेला रंग ही तुटीची मुख्य कारणे आहेत. पण या तुटीबरोबर व्याज, देणग्या, वार्षिक वर्गण्या अशा काही जमेच्या खात्यात संकल्पापेक्षा जमाही अधिक झाली असल्याचे दिसून येईल. ताळेबंदातील वर्षारंभी १,९५,८०६–१५ अशा शिल्लक रकमा होत्या. चालू वर्षाअखेर (मार्च ८१) ही शिल्लक ५३,३३७–०२ नी वाढलेली दिसेल. विश्वस्तांच्या स्थिरनिधीत रु.१६,८६७–००ची आजीव सदस्य वर्गणीची व राखीव निधीत रु.१८५०० ची देणगीरूप भर पडलेली आहे.

### आभार :

परिषदेच्या अनेकविध कार्यात अनेक संस्था आणि व्यक्ती यांचे सहकार्य लाभत असते. महाराष्ट्र शासनाचे शिक्षणखाते, म. राज्य साहित्य-संस्कृती मंडळ, पुणे महानगरपालिका, वृत्तपत्रे यांचा याबाबतीत आवर्जून उल्लेख करणे कर्तव्य वाटते. रोख वा वस्तुरूपाने देणग्या देणारे देणगीदार आणि विनंती करताच आजीव सभासदत्वाची वर्गणी देणारे विविध प्रादेशिक विभागातील आणि समाजथरातील साहित्यिक-साहित्यप्रेमी यांचे ऋण तर फार मोठे आहे. परिषदेच्या सभासदांत प्रथितयश लेखक कमी आहेत असे अधूनमधून बोलले-लिहिले जाते. अशा

आक्षेपकांनी परिषदेत येऊन कृपया सभासद यादी पाहावी. गेल्या दोनतीन वर्षांपासून पहाट आणि काव्यशिल्प ( नवोदितांच्या संस्था ), साहित्यप्रेमी भगिनी–मंडळ, बांगला भारती इत्यादी संस्थांच्या कार्याला परिषद सक्रिय प्रोत्साहन देत आली हेही नमूद करावेसे वाटते. साहित्याशी संबंध असणाऱ्या सर्वांचे सहकार्य हवे आहे आणि परिषद सर्वांना सहकार्य देण्यास उत्सुक आहे.

म. श्री. दीक्षित
न. म. जोशी } कार्यवाह
द. ता. भोसले

२६–५–१९८१

अनुक्रमणिका



महाराष्ट्र-साहित्य-परिषद

१ एप्रिल १९८० ते ३१ मार्च १९८१
या वर्षांचे

उत्पन्न-खर्च पत्रक
ताळेबंद व अर्थसंकल्प

अनुक्रमणिका

**शेड्यूल II**

**दिनांक १ एप्रिल १९८० ते ३१ मार्च**

| खर्च | रु. पै. | रु. पै. |
|---|---|---|
| **मालमत्तेसंबंधी :** | | |
| भुईभाडे व महापालिका कर | — | |
| इमारत दुरुस्ती व रंग | १८,०२७-७५ | |
| विमा | ६५-०० | |
| फर्निचर व वस्तु दुरुस्ती | ७८९-३० | १८,८८२-०५ |
| **व्यवस्थापन :** | | |
| पगार व प्रॉव्हिडंट फंड | १४,२९२-३५ | |
| छपाई, टायपिंग व स्टेशनरी | १,९८६-९५ | |
| टपाल व दूरध्वनी ... | २,६४८-१५ | |
| कार्यकारी मंडळ (प्रवासादी खर्च) ... | ४,६३४-२५ | |
| प्रवास व प्रचारकार्य | २,१७७-५० | |
| वीज | ३,१३९-४१ | २८,८७८-६१ |
| **हिशोब-तपासनीस फी** | | ३५०-०० |
| **किरकोळ खर्च :** | | |
| आतिथ्य | ८८१-६५ | |
| विश्वस्त खाते | ७९-६० | |
| इतर | १,१२१-४५ | २,०८२-७० |
| **घसारा :** | | |
| इमारत २½ टक्के | १,७२८-९८ | |
| फर्निचर १० टक्के | ९५८-८५ | |
| ग्रंथालय १० टक्के | ३,६१६-६८ | ६,३०४-५१ |
| **संस्थेच्या उद्देशांकरिता :** | | |
| साहित्य व सांस्कृतिक कार्यक्रम | ५,१०१-८८ | |
| महामंडळ (सभाखर्च व वर्गणी) | १,०३६-६६ | |
| शाखासभा (वर्गणी हिस्सा) ... | ३,३३२-०० | |
| पत्रिका (कागद, छपाई, टपाल इ.) ... | २४,५८३-४५ | |
| ग्रंथालय (वेतन व इतर खर्च) | ४,९३५-४० | ३८,९८९-३९ |
| बेरीज पुढील पानावर रुपये ... | | ९५,४८७-२६ |

अनुक्रमणिका

परिषद्, पुणे ४११०३०

नियम (१) प्रमाणे

१९८१ या वर्षाचे उत्पन्न-खर्च पत्रक

| उत्पन्न | रु. पै. | रु. पै. |
|---|---|---|
| **व्याज :** | | |
| सेव्हिंग खात्यावरील | १,२१४-४९ | |
| टेवींवरील | १६,९०६-८० | १८,१२१-२९ |
| **डिव्हिडंड** | | १४३-०० |
| **देणग्या** | | २०,८२६-५० |
| **अनुदाने :** | | |
| साहित्य संस्कृती मंडळ (पत्रिकेसाठी)... | ९,०००-०० | |
| ग्रंथालय ... | १,९९३-०० | |
| महानगरपालिका | ५००-०० | ११,४९३-०० |
| **इतर उत्पन्ने :** | | |
| साधारण सभासद वर्गणी | १२,४८०-५० | |
| संलग्नसंस्था वर्गणी ... | १००-०० | |
| पत्रिका (वर्गणी, विक्री व जाहिरात) ... | २,९३७-०७ | |
| किरकोळ जमा | ४५५-०० | १५,९७२-५७ |
| तूट (१९८०-८१) ताळेबंद वर्ग ... | | ३०,९०१-२५ |
| बेरीज पुढील पानावर रुपये ... | | ९७,४५७-६१ |

महाराष्ट्र साहित्य

शेड्यूल II

दिनांक १ एप्रिल १९८० ते ३१ मार्च

| खर्च | रु. पै. | रु. पै. |
| --- | --- | --- |
| मागील पानावरून बेरीज | | ९५,४८७–२६ |
| **पारितोषिके व स्मृतिदिन :** | | |
| कै. ह. स. गोखले | १००–०० | |
| कै. अ. स. गोखले | १००–०० | |
| कै. विश्वनाथ-पार्वती गोखले | १५०–०० | |
| कै. गिरिजा-गंगाधर जांभेकर | १००–०० | |
| कै. ह. ना. आपटे ... | २००–०० | |
| कै. शि. म. परांजपे ... | ४५०–०० | |
| कै. विनायक कोंडदेव ओक स्मृत्यर्थ ... | १०४–२० | |
| कै. नाथमाधव स्मृत्यर्थ | १५०–०० | |
| कै. ना. गो. चापेकर | ४४९–२० | १,८०३–४० |
| प्रकाशने (खर्च) | | १६६–९५ |
| एकूण बेरीज रुपये .. | | ९७,४५७–६१ |

आमच्या आजच्या तारखेच्या अहवालानुसार
पाटणकर अँड असोसिएट्स्
चार्टर्ड अकौंटंट्स्करिता
एन. सी. भळगट
भागीदार

पुणे,
दिनांक २६ मे १९८१

अनुक्रमणिका

परिषद, पुणे ४११०३०

नियम (१) प्रमाणे

१९८१ या वर्षाचे उत्पन्न–खर्च पत्रक

| उत्पन्न | रु. पै. | रु. पै. |
| --- | --- | --- |
| बेरीज मागील पानावरून | | ९७,४५७–६१ |
| एकूण बेरीज रुपये ... | | ९७,४५७–६१ |

पु. शं. पतके
कोषाध्यक्ष

म. श्री. दीक्षित
न. म. जोशी
द. ता. भोसले
कार्यवाह

अनुक्रमणिका

## शेड्यूल VIII

### दिनांक ३१ मार्च १९८१

| निधी व देणी | रु. पै. | रु. पै. | १९८०–८१ रु. पै. |
|---|---|---|---|
| **विश्वस्त निधी :** | | | |
| मागील ताळेबंदावरून ...... | | १,३१,४५९–४५ | |
| १९८०–८१ मधील आजीव सदस्य वर्गणी ...... | | १६,८६७–०० | १,४८,३२६–४५ |
| **इतर राखीव निधी :** | | | |
| (१) इमारत | | ८९,६४४–९४ | |
| (२) ग्रंथालय | | २३,५७३-१० | |
| (३) हीरक महोत्सव प्रकाशने | | | |
| मागील ताळेबंदावरून | ३३,४७३–४९ | | |
| १९८०–८१ मधील विक्री | २–५५ | | |
| ३१–३–८१ चा साठा | ३,९५७–४० | | |
| | ३७,४३३–४४ | | |
| वजा दि.१-४-८०चा साठा | ३,९५९–९५ | ३३,४७३–४९ | |
| (४) वाङ्मयेतिहास योजना | | | |
| मागील ताळेबंदावरून | १,२६,७४४–१९ | | |
| १९८०–८१ मधील विक्री | २,४८२–५० | | |
| अधिक ३१-३-८१चा साठा | ५१,४३०–०० | | |
| | १,८०,६५६–६९ | | |
| वजा दि. १-४-८०चा साठा | | १,८०,६५६–६९ | |
| (५) प्रकाशन निधी | | ३३,०९१-२० | |
| (६) कै. विनायक कों. ओक स्मृतिदिन निधी | | १,०००–०० | |
| (७) कै. नाथमाधव स्मृतिदिन निधी | | १,५००–०० | |
| (८) कै. केतकर स्मृतिदिन निधी | | १,५००–०० | |
| (९) कै. पिलाजीराव फडणीस निधी | | ३,०००–०० | ३,६७,४३९–४२ |
| **कर्जे :** | | | |
| तारणावरील वा तारण न दिलेली ...... | | — | — |
| बेरीज पुढील पानावर रुपये ... | | | ५,१५,७६५–८७ |

अनुक्रमणिका

परिषद, पुणे ४११०३०

नियम (१) प्रमाणे

रोजीचा ताळेबंद

| जिंदगी व येणी | रु. पै. | रु. पै. | १९८०-८१ रु. पै. |
|---|---|---|---|
| **स्थिर जिंदगी :** | | | |
| मागील ताळेबंदावरून | | ६९,१५८-७२ | |
| अधिक चालू वर्षातील वाढ ...... | | | |
| वजा - घसारा चालू वर्षाचा २½ टक्के | | १,७२८-९८ | ६७,४२९-७४ |
| **गुंतवणुका :** | | | |
| (१) रोखे दर्शनी किंमतीचे | | | |
| ३ टक्के कन्व्हर्शन लोन १९४६ चे | ५,३००-०० | | |
| ३ टक्के कन्व्हर्शन लोन १९४६ चे | २,७००-०० | ८,०००-०० | |
| (२) शेअर्स | | | |
| सें. प्रॉव्हिन्सेस रेल्वेज | २,३००-०० | | |
| महा.स्टेट को.ऑप.बँक लि., | १,२५०-०० | ३,५५०-०० | ११,५५०-०० |
| **फर्निचर व डेडस्टॉक** | | | |
| मागील ताळेबंदावरून | ९,०५१-६६ | | |
| + १९८०-८१ची खरेदी | ५३७-०० | ९,५८८-६६ | |
| वजा—घसारा | | ९५८-८५ | ८,६२९-८१ |
| बेरीज पुढील पानावर रुपये ... | | | ८७,६०९-५५ |

शेड्यूल VIII

दि. ३१ मार्च १९८१

| निधी व देणी | रु. पै. | रु. पै. | १९८०–८१ रु. पै. |
|---|---|---|---|
| बेरीज मागील पानावरून | | ५,१५,७६५–८७ | |
| **देणी :** | | | |
| कै. जांभेकर पारितोषिक | | १,०८०–०० | |
| कै. विश्वनाथ-पार्वती गोखले पारितोषिक | | ५,९३६–०० | |
| कै. ह. ना. आपटे कादंबरी पारितोषिक | | १,०००–०० | |
| कै. अंतूकाका भिडे पारि. | | ५००–०० | |
| सांगली शाखा पारितोषिक | | ४००–०० | |
| कै. अ. स. व ह. स. गोखले पारितोषिक | | २,०००–०० | |
| कै. शि. म. परांजपे पारि. | | ३,५००–०० | |
| ग्रंथालय अनामत | | १२,२७६–०० | |
| हिशोब-तपासनीस | | ३५०–०० | |
| कै. ना. गो. चापेकर पारितोषिक | | ४,०००–०० | |
| कै. तुळशीराम वात्र– पारितोषिक | | ५,०००–०० | |
| कै. श्री. म. माटे स्मृति-व्याख्यानमाला | | ५,०००–०० | ४१,०४२–०० |

| | |
|---|---|
| बेरीज पुढील पानावर रुपये ... | ५,५६,८०७–८७ |

अनुक्रमणिका

## परिषद्, पुणे ४११०३०

**नियम ( १ ) प्रमाणे**

**रोजीचा ताळेबंद**

| जिंदगी व येणी | रु. पै. | रु. पै. | १९८०–८१ रु. पै. |
|---|---|---|---|
| वेरीज मागील पानावरून | | | ८७,६०९–५५ |
| **ग्रंथालय :** | | | |
| मागील ताळेबंदावरून | ३४,५६०–९८ | | |
| + १९८०–८१ ची खरेदी | १,६०५–८५ | ३६,१६६–८३ | |
| वजा–घसारा | | ३,६१६–६८ | ३२,५५०–१५ |
| **शिल्लक साठा :** | | | |
| प्रकाशने | | ६,०५७–०९ | |
| वाङ्मयेतिहास प्रकाशने | | ५१,४३०–०० | |
| हीरकमहोत्सव प्रकाशने | | ३,९५७–४० | ६१,४४८–४९ |
| **वाङ्मयेतिहास योजना** | | | |
| मागील वर्षापर्यंतचा खर्च | | ६९,२३९–४५ | |
| + १९८०–८१चा खर्च | | ३,०३०–१५ | ७२,२६९–६० |

## महाराष्ट्र साहित्य

### शेड्यूल VIII

### दिनांक ३१ मार्च १९८१

| निधी व देणी | रु. पै. | रु. पै. | १९८०-८१ रु. पै. |
|---|---|---|---|
| बेरीज मागील पानावरून | | | ५,५६,८०७-८७ |
| **संशोधन निधी :** | | | |
| गेल्या वर्षाप्रमाणे | | | |
| ( पुणे विद्यापीठ ) | | १,०००-०० | |
| ग्रंथ प्रकाशनार्थ देणगी | | | |
| (सा. सं. मंडळ) | | १३,२३०-०० | |
| | | १४,२३०-०० | |
| **वजा**-संशोधनखर्च | | २,३४९-५० | ११,८८०-५० |
| **ग्रंथव्यवहार परिषद :** | | २,३४३-९२ | |
| **वजा**-खर्च ८०-८१ | | १,३१२-८० | १,०३१-१२ |
| **प्रॉव्हिडंट फंड** | | | |
| मागील ताळेबंदावरून | | १०,९९७-६४ | |
| अधिक ८०-८१ची जमा ...... | | १,५४२-५० | १२,५४०-१४ |
| **अमृतमहोत्सव अनुदाने** ...... | | ५०,१०१-०० | |
| **वजा** - १९८०-८१तील खर्च ...... | | २,५८१-९० | ४७,५१९-१० |
| एकूण बेरीज | | | ६,२९,७७८-७३ |

आमच्या आजच्या तारखेच्या अहवालानुसार
पाटणकर अँड असोसिएट्स्
चार्टर्ड अकौंटंट्स्करिता
एन. सी. भळगट
भागीदार

पुणे,
दि. २६ मे १९८१

अनुक्रमणिका

परिषद, पुणे ४११०३०

नियम (१) प्रमाणे

रोजीचा ताळेबंद

| जिंदगी व येणे | रु. पै. | रु. पै. | १९८०–८१ रु. पै. |
|---|---|---|---|
| बेरीज मागील पानावरून | | | २,५३,८७३–७९ |
| **वीज बोर्ड अनामत** | | | २६०–०० |
| **आयकर वसुली** | | | २४६–०० |
| **इतर येणी** | | | १,३३७–९० |
| **अखेर शिलका :** | | | |
| रोख | | १९४–०५ | |
| बँक ऑफ महाराष्ट्र (सेव्हिंग्ज) ...... | | ४३,४१२–९९ | |
| ,, ,, ,, (ठेवी) | | ३९,९००–०० | |
| स्टेट बँक विश्वस्त (सेव्हिंग्ज) ...... | | १,९२५–२८ | |
| ,, ,, ,, (ठेवी) ...... | | १५,८००–०० | |
| ,, ,, ,, (ठेवी) ...... | | ५४,२००–०० | |
| बँक ऑफ बडोदा विश्वस्त (सेव्हिंग्ज) ... | | १३,८७१–४४ | |
| ,, ,, ,, (ठेवी) ...... | | ५७,०००–०० | |
| ,, ,, ,, (करंट) ...... | | ३,७९९–२७ | |
| गोखले बंधु पारितोषिक (ठेव) ...... | | २,०००–०० | |
| कै.शि.म.परांजपे पारि. (ठेव) ...... | | ३,५००–०० | |
| ग्रंथालय अनामत (ठेव) | | १,०००–०० | |
| प्रॉव्हिडंट फंड (सेव्हिंग्ज) | | ७,७४०–१४ | |
| प्रॉव्हिडंट फंड (ठेवी) | | ४,८००–०० | २,४९,१४३–१७ |
| **तूट** | | | |
| मागील ताळेबंदावरून | | ९४,०१६–६२ | |
| + ८०–८१ची तूट | | ३०,९०१–२५ | १,२४,९१७–८७ |
| एकूण बेरीज रुपये | | | ६,२९,७७८–७३ |

| | | |
|---|---|---|
| पु. शं. पतके | म. श्री. दीक्षित | लक्ष्मणशास्त्री जोशी |
| कोषाध्यक्ष | न. म. जोशी | वि. त्र्यं. शेटे |
| | द. ता. भोसले | वि. ग. माटे |
| | कार्यवाह | विश्वस्त |

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य

**जमा** **अर्थसंकल्प**

| खाते | संकल्प १९८०–८१ | प्रत्यक्ष १९८०–८१ | संकल्प १९८१–८२ |
|---|---|---|---|
| | रु. पै. | रु. पै. | रु. पै. |
| व्याज व डिव्हिडंड | १७,०००–०० | +१८,२६४–२९ | २०,०००–०० |
| देणग्या | १६,५००–०० | +१८,८२६–५० | १८,०००–०० |
| शासकीय अनुदान | १०,०००–०० | — | ५,०००·०० |
| महापालिका अनुदान | ५००–०० | ५००–०० | १,०००–०० |
| ग्रंथालय अनुदान | २,५००–०० | १,९९३–०० | २,०००–०० |
| सा.सं.मंडळ अनुदान (पत्रिका) | ८०००–०० | + ९,०००–०० | ८,०००–०० |
| पत्रिका–वर्गणी, जाहिरात | २,०००–०० | + २,९३७–०७ | ३,०००–०० |
| साधारण सभासदवर्गणी | १०,०००–०० | +१२,४८०–५० | १२,०००–०० |
| संलग्नसंस्था वर्गणी | २००–०० | १००-०० | २००–०० |
| किरकोळ | ३००–०० | +४५५–०० | ४००–०० |
| प्रकाशने (विक्री) | १,०००–०० | १६४–६० | ५००–०० |
| संमेलनाकडून | २,०००–०० | २,०००–०० | — |
| संशोधन (प्रकाशन) | १,५००–०० | १४,२३०–०० | ३,०००–०० |
| ग्रंथव्यवहार-परिषद | ५,०००–०० | २,३८३–९२ | २,०००–०० |
| **तूट** | ३०,०००–०० | ३०९०१–२५ | ३८,९००–०० |
| एकूण रुपये ... | | | १,१४,०००–०० |

दि. २६ मे १९८१

अनुक्रमणिका



परिषद्, पुणे ४११०३०

१९८१-८२

खर्च

| खाते | संकल्प १९८०-८१ | प्रत्यक्ष १९८०-८१ | संकल्प १९८१-८२ |
|---|---|---|---|
| | रु. पै. | रु. पै. | रु. पै |
| कर व भुईभाडे | ४००-०० | — | १,०००-०० |
| इमारतदुरुस्ती, रंग व विमा | २०,०००-०० | १८,०९२-७५ | २,०००-०० |
| फर्निचर व इतर वस्तू | १,०००-०० | ७८९-३० | ३,०००-०० |
| पगार व प्रॉ. फंड | १२,०००-०० | +१४,२९२-३५ | १५,०००-०० |
| छपाई, टायपिंग, स्टेशनरी | ३,०००-०० | १,९८६-९५ | २,५००-०० |
| टपाल व दूरध्वनी | ३,०००-०० | २,६४८-१५ | ३,०००-०० |
| वीज | २,५००-०० | + ३,१३९-४१ | ३,५००-०० |
| कार्यकारी मंडळ-सभा | ३,०००-०० | + ४,६३४-२५ | ५,०००-०० |
| प्रवास व प्रचार कार्य | १,०००-०० | + २,१७७-५० | २,०००-०० |
| साहित्य व सांस्कृ. कार्यक्रम | ५,०००-०० | + ५,१०१-८८ | ५,०००-०० |
| पत्रिका (छपाई, कागद, टपाल) | २०,०००-०० | + २४,५८३-४५ | २५,०००-०० |
| ग्रंथालय (व्यवस्था ग्रंथखरेदी) | ५,०००-०० | ४,९३५-४० | ५,०००-०० |
| शाखासभा (वर्गणीहिस्सा) | ३,०००-०० | + ३,३३२-०० | ३,०००-०० |
| महामंडळ सभा व वर्गणी | १,०००-०० | + १,०३६-६६ | १,५००-०० |
| आतिथ्य | ६००-०० | + ८८१-६५ | १,०००-०० |
| ग्रंथपारितोषिके व स्मृति | २,५००-०० | १,८०३-४० | ३,०००-०० |
| हिशेब तपासनीस | ४००-०० | ३५०-०० | ४००-०० |
| किरकोळ | १,०००-०० | + १,१२१-४५ | १,०००-०० |
| संशोधन (प्रकाशन) | १५,०००-०० | २,३४९-५० | १६,०००-०० |
| प्रकाशने (इतर) | १०,०००-०० | १६६-९५ | १,०००-०० |
| ग्रंथव्यवहार-परिषद | २,५००-०० | १,३५२-८० | २,०००-०० |
| विश्वस्त व्यवहार | १००-०० | ७९-६० | १००-०० |
| घसारा | ८,०००-०० | ६,३०४-५१ | ८,०००-०० |
| त्रैवार्षिक निवडणूक | | | ५०००-०० |
| | एकूण रुपये ... | | १,१४,०००-०० |

पु. शं. पतके
कोषाध्यक्ष

म. श्री. दीक्षित
न. म. जोशी
द. ता. भोसले
} कार्यवाह

अनुक्रमणिका

# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ४११०३०

## विश्वस्तांकडील निधी : ताळेबंदानुसार

(३१ मार्च १९८१)

| १९७९–८० रु. पै. | | रु. पै. | १९८०–८१ रु. पै. | वाढ रु. पै. |
|---|---|---|---|---|
| २,७००–०० | **(१) रोखे दर्शनी किंमतीचे** | २,७००–०० | २,७००–०० | |
| | ३ टक्के कन्व्हर्शन लोन १९४६ चे | | | |
| | **(२) शेअर्स** | | | |
| | सें. प्रॉव्हि. रेल्वेज (१०० रु. चे २३) | २,३००–०० | | |
| ३,५५०–०० | महा. स्टेट. को-ऑप. बँक लि, (५० रु. चे २५) | १,२५०–०० | ३,५५०–०० | |
| | **(३) स्थिरनिधी** | | | |
| ७०,०००–०० | स्टेट बँक (ठेवी) १५८०० + ५४२०० | ७०,०००–०० | | |
| २५,०००–०० | बँक ऑफ बडोदा (ठेवी) | ५७,०००–०० | | |
| ९,५९९–०३ | स्टेट बँक (सेव्हिंग्ज खाते) | १,९२५–२८ | | |
| २३,०९३–९६ | बँक ऑफ बडोदा (सेव्हिंग्ज खाते) | १३,८७१–४४ | १,४२,७९६–७२ | १५,१०३–७३ |
| १,२७,६९२–९९ | | | | |

अनुक्रमणिका

| १९७९–८० रु. पै. | | रु. पै. | १९८०–८१ रु. पै. | वाढ रु. पै. |
|---|---|---|---|---|
| | (४) राखीव निधी | | | |
| १,०८०–०० | गिरिजा-गंगाधर जांभेकर ग्रंथ-पारितोषिक ( ठेव ) | १,०८०–०० | | |
| ५,९३६–०० | विश्वनाथ–पार्वती गोखले पारितोषिक ( लोन ) | ५,९३६–०० | | |
| १,०००–०० | ह. ना. आपटे कादंबरीकार ( ठेव ) | १,०००–०० | | |
| ५००–०० | अंतूकाका भिडे ग्रंथपारितोषिक ( ठेव ) | ५००–०० | | |
| २,०००–०० | ह. स. गोखले व अ. स. गोखले पारितोषिक ( ठेव ) | २,०००–०० | | |
| ३,५००–०० | शि. म. परांजपे ग्रंथपारितोषिक ( ठेव ) | ३,५००–०० | | |
| ४००–०० | सांगली शाखासभा (ठेव) | ४००–०० | | |
| १,०००–०० | वि. कों. ओक स्मृतिदिनासाठी ( ठेव ) | १,०००–०० | | |
| १,५००–०० | नाथमाधव स्मृतिदिनासाठी ( ठेव ) | १,५००–०० | | |
| | ना. गो. चापेकर ग्रंथपारितोषिक ( ठेव ) | ४,०००–०० | | |
| | तुळशीराम वाघ ग्रंथपारितोषिक ( ठेव ) | ५,०००–०० | | |
| | श्री. म. माटे व्याख्यानमाला ( ठेव ) | ५,०००–०० | | |
| | ज्ञानकोशकार केतकर स्मृतिदिन | १,५००–०० | | |
| | पिलाजीराव फडणीस स्मृतिदिन ( ठेव ) | ३,०००–०० | | |
| १६,९१६–०० | | | ३५,४१६–०० | १८,५००–०० |
| १,५०,८५८–९१ | | | १,८४,४६२–७२ | ३३,६०३–७३ |

परिषदेचे नवे प्रकाशन

# भाषा व साहित्यसंशोधन

संपादक : डॉ. वसंत स. जोशी

पृष्ठे : डेमी अंदाजे ४५०, मूल्य ३० रु.

**या ग्रंथात**

विषय परिचय ( व. स. जोशी ), संशोधन : स्वरूप आणि पद्धती (व. दि. कुलकर्णी ), भाषावैज्ञानिक संशोधनाच्या नव्या दिशा ( अशोक रा. केळकर ), बोलीभाषांचा अभ्यास ( सु. बा. कुलकर्णी), अभिलेखागारे (ग. ह. खरे), ऐति० कागदपत्रे: संशोधन संपादन ( गो. त्र्यं. कुलकर्णी ), प्राचीन हस्तलिखिते आणि त्यांचे जतन ( यू. म. पठाण ), वृत्तपत्रे आणि संशोधन ( स. गं. मालशे ), लेखविद्या ( सौ. शोभना गोखले ), महानुभावांच्या सांकेतिका लिप्या : निर्मितिमीमांसा ( यू. म. पठाण ), पाठचिकित्सा ( वि. भि. कोलते ), पाठचिकित्साविषयक परिभाषा ( वेंकटशास्त्री जोशी ), कालनिर्णय पद्धती ( ग. ह. खरे ), संहितेचा संख्याशास्त्रीय अभ्यास ( मु. ग. प्रभुगावकर ), भाषा आणि साहित्य ( अशोक रा. केळकर ), साहित्यसमीक्षा आणि संशोधन ( दु. का. संत ), संशोधनातील तीन प्रारंभिक प्रक्रिया (स. गं. मालशे), विशिष्ट साहित्यकृतीचा अभ्यास (व. दि. कु.), विशिष्ट ग्रंथकाराचा अभ्यास (प्र. ल. गावडे), तत्त्वविज्ञानविचार आणि मराठी संशोधन ( वि. रा. करंदीकर ), तौलनिक वाङ्मय काही विचार (पंडित आवळीकर), विशिष्ट कालखंडाचा अभ्यास ( गो. म. कुलकर्णी ), वाङ्मयेतिहास लेखन : काही विचार ( रा. श्री. जोग), विद्यापीठीय प्रबंधलेखन ( हे. वि. इनामदार ), कोशरचना आणि मराठी कोशवाङ्मय ( सु. रा. चुनेकर ), ग्रंथालयीन संदर्भसाहाय्य (म. प. पेठे), सूची व कोशवाङ्मयातील वर्णानुक्रमी ( मो. रा. वाळंबे ), विद्यापीठीय स्तरावरील मराठी संशोधन ( म. प. पेठे ), याशिवाय उपयुक्त परिशिष्टे, विस्तृत सूची इत्यादी.

**(सवलतीचा दर २१ रु./ मुदत ३० जुलै १९८१ पर्यंत)**

अनुक्रमणिका